सत्कार्योत्तेजक सभा–धुळें

## महाराष्ट्रधर्मग्रन्थमाला

ग्रन्थ तिसरा

श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें

# योगवासिष्ठ

हें बोलिले वसिष्ठ । ह्मणौनि नांव वासिष्ठ ।
यामाजीं श्रेष्ठ । आत्मज्ञान ॥

श्रीज्ञानेश्वर.




संपादक

गोविंद काशिनाथ चांदोरकर



रामनवमी १८३६

किंमत बारा आणे

# प्रस्तावना

यथा पदं पुण्यमनुप्रयाता । महानुभावा रघवो विशोकाः ।
वसिष्ठवाक्यप्रसरेण साधो । गन्तव्यमाद्यं पदमेवमेव ॥ श्री. यो. वा.

भारतीय युद्धाचे वेळीं अर्जुनास व्यामोह उत्पन्न झाला, त्यामुळें त्याचे ठिकाणीं हृदयदौर्बल्य आलें व त्या दुर्बलतेचा परिणाम वीरवृत्ति असंतुष्ट होऊन त्याचे अंतःकरणांतून निघून गेली; स्वकर्मापासून तो पराङ्मुख होऊं लागला; व्यामोह इतका बलवत्तर झाला कीं, परकर्म जें " भैक्ष्य " तें हि त्यास अधिक श्रेयस्कर वाटूं लागलें. त्या वेळीं श्रीमद्भगवद्गीतेचा अवतार झाला. वीरास उचित जे मनोविकार ते च कोणी सगरपुत्र, त्यांचा उद्धार करण्यास परमात्म्याच्या मुखापासून गीतामृतवाहिनी श्रीगंगा च निघाली, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

श्रीकृष्णावतारांत सर्वोपनिषदांचे दोहन करून ज्या ज्ञानाचा उपदेश भगवंतांनीं गुरु ह्मणून केला, तें च ज्ञान श्रीरामावतारांत शिष्य ह्मणून श्रीगुरु वसिष्ठांच्या मुखानें त्यांनीं प्राशन केलें. मला वाटतें प्रथमावतारांत उपदिष्ट ज्ञान कितपत बिंबलें त्याचा अनुभव पुढील अवतारांत शिष्योपदेशानें घेतला असावा. कधीं गुरु तर कधीं शिष्य, कोणत्या तरी एका स्वरूपानें अथवा अधिक बिनचुक बोलावयाचें ह्मणजे आपण च गुरु व आपण च शिष्य होऊन, जगाचे स्थितीस कारण असणारा जो धर्म त्याचें प्राकट्य करावयाचें हा च परमेश्वराचा हेतु होता.

'हें जुंझ काय ! व ही तुझी अकालीं सदयता कोठली !' असें जें भगवंतांनीं अर्जुनास म्हटलें होतें तसें म्हणण्याचा श्रीरामांनीं मात्र प्रसंग आणला नव्हता. क्षत्रियांस स्वधर्मापासून च्युत करणारें वैराग्य उपयोगी नाहीं. तसलें अर्जुनास झालें होतें; श्रीरामांना ही तीर्थाटणा-

नंतर—युद्धास ठाकलें असतांना नव्हे-सहज वैराग्य उत्पन्न झालें होतें.

विविधदोषदशापरिचिन्तनैः । विततभङ्गुरकारणकल्पितैः ।
मम न निर्वृतिमेति मनो मुने । निगडितस्य यथा वनदन्तिनः ॥ १२४८७

अशी शिष्याची दशा झालेली पाहून सूर्यवंशाचे गुरु जे वसिष्ठऋषी त्यांनीं त्यांना—श्रीरामांना—बोध केला; तो ज्या ग्रंथांत ग्रथित आहे तें योगवासिष्ठ अथवा वसिष्ठगीता.

१७ अध्याय गीता गायिल्यावर व अठराव्या अध्यायीं पुन्हा सर्व गीतेचें स्मरण दिल्यावर

नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ।
स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥

हें स्वकर्मापासून पराङ्मुख झालेल्या अर्जुनाकडून जसें भगवंतांनीं वदविलें, तसेंच ३२ हजार वासिष्ठगीता सांगितल्यावर

नष्टो मोहः पदं प्राप्तं त्वत्प्रसादान्मुनीश्वर ।
संपन्नोऽहमहं सत्यमत्यन्तमवदातधीः ॥
स्थितोऽस्मि गतसंदेहः स्वभावे ब्रह्मरूपिणी ।
निरावरणविज्ञानः करिष्ये वचनं तव ॥

अशी कबुली वासिष्ठांनीं श्रीरामाकडून हि घेतली.

श्रीमद्व्यासांनीं ७ शें श्लोकांत जीं तत्वें गोविलीं आहेत त्यांचा च विस्तार श्रीवसिष्ठांनीं ३२ हजारांत केलेला आहे. हा उपदेश श्रीमहर्षि-वाल्मिकी-प्रणित असल्यानें या काव्याचें स्फुटत्व, त्यांतील अलंकारप्राचुर्य, वर्णनें, कल्पना, रसपोष, थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे त्यांत दिसून येणारी कविप्रतिभा अलौकिक आहे. श्रीमद्भगवद्गीता हें **सार** आहे, तर श्रीयोगवासिष्ठ हा **विस्तार** आहे; ह्मणजे पहिलींत सर्व तत्वें तेवढीं येकवट केलीं आहेत, तर दुसऱ्यांत त्या तत्वांचा कथानकरूपानें बोध केला असल्यानें त्यांचा सुबोध असा विस्तार झाला आहे.

वेद, वेदांगें, यांचें अध्ययन करण्याचा अधिकार स्त्रीशूद्रादि-

कास नाहीं; हा त्यांचा एकांगीपणा काढून टाकण्याच्या परमकारुणिक बुद्धीनें महर्षि वाल्मीक व वेदोनारायण श्रीव्यास या दोघांनीं ग्रंथरूपानें ही एक विशिष्ट योजना करून ठेविली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

वर दर्शविलेली ही योगवासिष्ठाची योजना अत्यंत सुखद असली तरी, तिचा विस्तार फार मोठा असल्यानें, संदर्भाचा भंग न होऊं देतां त्या ग्रंथराजाचें सार काढण्याचा दोघा विद्वानांनीं दोन भिन्न वेळीं प्रयत्न केलेला आहे. एक हरिहराचार्य नांवाच्या पंडितांनीं ६ हजारांचा ' लघुयोगवासिष्ठ ' नामक ग्रंथ केला आहे व त्यावर योगेश्वर यांची टीका आहे, असें हरिदास म्हणतात. या हरिहराचार्यांचा अथवा योगेश्वरांचा काल निश्चिततेनें कळण्यास आज जरी साधन नाहीं तरी, श्रीशंकराचार्यांच्या परंपरेमधील हे आचार्य असल्यानें त्यांचे कालासंबंधीं साधारण अनुमान काढणें शक्य होईल. दुसरा २२५ श्लोकांचा ' लघुयोगवासिष्ठसार ' नांवाचा ग्रंथ आहे. हा ग्रंथ १२ वे शतकाच्या सुमाराचा असावा असें वाटतें. कारण त्यावर ' महीधरांनीं ' टीका केलेली आहे. त्या टीकेवरून जरी त्याचेबद्दल कांहीं माहिती मिळत नाहीं, तरी यजुर्वेदावर भाष्य करणारे व आपल्या भाष्यांत **उव्वटांचा** उल्लेख करणारे जर हे च महीधर असतील तर त्यांचा काल ११ वे शतकाचे नंतर केव्हां तरी आहे हें उघड आहे. कारण उव्वट हे ११०० चे सुमारास होते. प्रो. चांदोरकर हे आपल्या ' काव्यप्रकाशा ' च्या प्रस्तावनेंत उव्वटांचे बंधु ' मम्मट ' हे शक १०९२ चे पूर्वीं होऊन गेले असें निश्चिततेनें सांगतात. उव्वटांचा असा उल्लेख ग्रंथांतरीं होण्यास निदान २ शतकें तरी त्यांचे कालापासून गेलीं असलीं पाहिजेत. तेव्हां महीधरांचा काल शक १३०० ठरतो; म्हणून शक १३०० च्या पूर्वीं केव्हां तरी ' लघुयोगवासिष्ठसार ' रचला गेला असला पाहिजे, हें उघड आहे. हे दोन्ही ग्रंथ संस्कृतांत आहेत हें निराळें सांगणें नकोच; त्यामुळें श्रीमहर्षि वाल्मिकी व श्रीव्यास यांच्या आर्ष-

भूवर उपकार करण्याच्या हेतूस कालानुरोधानें आळा बसणें सहज आहे. त्या सद्धेतूची सार्वकालीन व आर्यभूंत तरी सार्वत्रिक सिद्धि व्हावी म्हणून मराठींत रचना करण्याकारितां श्रीविष्णूस च स्वतः अवतार घ्यावा लागला. हा अवतार म्हणजे ' श्रीज्ञानेश्वरमहाराज ' होत.

**ज्ञानेशो भगवान् विष्णुः ॥**

हा अवतार श्रीक्षेत्र पैठण नजीक **आपेगांव** म्हणून जें एक पुण्यक्षेत्र आहे तेथें झाला.

' प्रतिष्ठान **आपेगांवीं** ज्याचा जन्म । समाधी अलंके उद्बोधांत ' ॥

असें उद्बोधनाथांनीं म्हटलें आहे. हें चरित्र अत्यंत पुण्यद असल्यानें तें थोडेंसें गातों. **सत्यभाषण** हें जसें **वाचातप** आहे, तसें **संतगुणगान** हें **वाचाप्रायश्चित्त** आहे, तेव्हां त्यांत थोडा काल गेला तर तो लाभ च आहे. आपेगांवकर **श्रीविठ्ठलपंत** व आळंदीच्या मातोश्री **रुक्मिणीबाई** यांचा विवाह **आळंदीस** झाला. ( इहामुत्रफलभोग ) विराग यानें मुमुक्षेचें म्हणा अथवा अव्यभिचारिणी भक्तीचें म्हणा पाणिग्रहण केलें. इतकी पूर्वतयारी असून-हि ज्ञानरूप फल प्राप्त होण्यास श्रीसद्गुरूची जोड लागते, त्याप्रमाणें **श्रीरामानंदांचा** प्रसाद झाला; पण सद्गुरुउपदेशानें फार तर **बोध** उपजेल, ज्ञानोत्पत्तीस आत्मतपश्चर्या च पाहिजे. त्याप्रमाणें **श्रीविठ्ठलपंत** व **मातोश्री रुक्मिणीबाई** गुर्वाज्ञेनें स्वदेशीं म्हणजे **आपेगांवीं** येऊन राहिले व तेथें त्यांच्या तपश्चर्येस प्रारंभ झाला. लोकेषणा ही सर्वांत बलवत्तर आहे; तिचा त्याग करणें म्हणजे च तपश्चर्येचा कडेलोट होय. **भक्ति** आणि **वैराग्य** हीं बाह्यतः संसारांत, परंतु वस्तुतः जीवन्मुक्त स्थितींत राहूं लागलीं. याचें दर्शक च जणुं काय, या संसारी दाम्पत्यानें ग्रामाबाहेर पर्णकुटींत वस्ति केली. संसार तर करावयाचा, परंतु तो ग्रामत्यागानें करावयाचा. लोकसंमर्दापासून तर अलिप्त असावयाचें, परन्तु सर्वकाल एकान्तांत हि नसावयाचें.

अलौकिका नोह्यावे । लोकांप्रति ॥

ही च ' प्रपंचीं परमार्थाची ' खूण आहे. सद्गुरुप्रसादानंतर अशी उत्कट तपश्चर्या झाल्यावर ज्ञानोदयास कितीसा अवकाश !

दुजा पद्मनाभ **ज्ञानदेव** मूर्ति । एक सहस्रावर्ती त्र्याणवीचे ॥
श्रावण अष्टमी कृष्णपक्ष बरा । नंदन वत्सरामाजीं जन्म ॥
निवृत्तिप्रसाद तयावरी जाला । मार्गशीर्ष पूर्णा प्रमाथेसी ॥
रविशकशत एक तयावरी । दीक्षापट धरी **ज्ञाननाथ** ॥
भानुशत भानु रची ज्ञानेश्वरी । विकृत संवत्सरीं ज्ञानरूप ॥
या च शकीं रिपु ह्मैसा बोलविला । चालवी भिंतीला वसुमाजीं ॥
लोकोत्तरापूर्व चमत्कार केले । समाधि आथिलें योगबळें ॥
कार्तिकाची वद्य एकादशी पाह्यो । सूर्य अष्टदाह्यो शकशत ॥
जगासी दुर्मुख ह्मणौनि दुर्मुख । संवत्सर देख समाधीसी ॥
प्रतिष्ठान आपेगांवीं ज्याचा जन्म । समाधी आलंके उद्बोधांत ॥

भक्ति अथवा वैराग्य यांस कांहीं प्राप्य आहे; ज्ञानाचें तसें नाहीं, तें स्वतःसिद्ध आहे व ह्मणून जे ज्ञानी आहेत त्यांचें व भगवंताचें (दोन्ही वस्तुतः एक च ) कर्तव्य एक च.

परोपकाराय सतां विभूतयः ॥

किंबहुना दिवसरातीं । पुढिलांचें सुख उन्नति ।
आणित आणित स्वार्थी । प्रवेशिजे ॥

पुढिलांचें सुख व त्यांची उन्नति हा च ज्ञान्यांचा स्वार्थ; श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें चरित्र ह्मणजे या एका च तत्वाचें प्रत्यक्ष उदाहरण आहे. नामदेवाचें पंढरीक्षेत्रीं केलेलें गर्वहरण हें द्वैतांतील व ह्मणून प्रवृत्तींतील गुरुशिष्यांच्या परस्पर भेदभावनेचें व सेव्यसेवकतेचें उदाहरण आहे. आपेगांवाहून सर्व कुटुंब घेऊन श्रीविठ्ठलपंत पैठणीं आल्यावेळीं पितरांचें अवतरण व पशुमुखें प्रणवोच्चारण हें रूपकात्मक नसल्यास सर्वभूतीं अभेदत्व बिंबल्यानें

जे पृथ्वीतळीचे देव । जे तपोवतार सावयव ॥
सकळ तीर्थांसी दैव । उदयेले जे ॥

असे परमपूज्य ब्राह्मण त्यांस त्यांच्या आज्ञेचे च द्वारें स्वाधिकार व आ-

त्मप्रतीति बिंबविली आहे. जे अधिकारी होते ते उमगले, अनधिकारी कित्येक जन्म वाट पहात बसले असतील. येथें हि प्रवृत्तिनिवृत्तीची योग्य सांगड असून 'लोकशिक्षणाचें' कर्तव्य स्पष्ट केलें आहे. 'स्वधर्माची' बुजलेली ओळख श्रीज्ञानेश्वरी प्रगट करून उद्दीपित केली. इतकें प्रवृत्तीचें कार्य करून हि अवशेष राहिलेल्या चांगदेवरूपी लोकभ्रमाचें आळंदीस निराकरण केलें. योग हें साधन आहे, साध्य नव्हे, हें महाराजांनीं या प्रसंगानें चांगलें संबोधिलें आहे यांत संशय नाहीं.

महात्मे कर्तव्याचा मल लागूं नये म्हणून म्हणा अथवा सामान्य जनाच्या मनास विकृति होऊं नये म्हणून म्हणा स्वतः कांहीं करीत नाहींत, करवितात.

" न मे पार्थाऽस्ति कर्तव्यम् त्रिषु लोकेषु किंचन । "
" दास डोंगरीं राहतो, यात्रा देवाची पाहतो । "

उत्सवाची प्रवृत्ति करावयाची, परंतु आपण अलिप्ततेनें स्वांतरीं च निमग्न असावयाचें, हें च डोंगरीं अथवा त्रिकुटाचळीं राहणें. प्रवृत्तीकडून जग प्रसवून त्यांत हि आपण स्फूर्तिरूपानें रहावयाचें परंतु वस्तुतः उदासीन ते उदासीन च. स्वधर्माची अथवा स्वकर्माची ओळख करून देण्यास चमत्कार व ग्रंथरचना करावयाची, लोकांस मार्गास लागण्याचें साधन उत्पन्न करून देऊन जिज्ञासा अथवा स्फूर्तिरूपानें त्यांच्यांत राहावयाचें, इतकें च स्वतः केलें म्हणजे जे महात्मे आहेत त्यांचें अवतारकार्य संपलें. पुढचा मार्ग ज्यानें त्यानें आपण च आक्रमिला पाहिजे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं आपल्या चारित्र्यानें व ग्रंथांनीं स्वधर्मभ्रष्ट आणि स्वकर्मविमूढ अशा महाराष्ट्रास प्रपंचपरमार्थाच्या आपत्तींतून मुक्त होण्याचा मार्ग दाखवून आपला अवतार श्रीक्षेत्र आळंदी येथें समाप्त केला; पण तो खरोखर त्या वेळीं समाप्तीला गेला काय? नाहीं. जडदेहरूपानें ( श्रीज्ञानेश्वरींतील ६ वे अध्यायांत वर्णन केल्याप्रमाणें

योगसिद्धीनें दोन महाभूतांपासून विमुक्त झालेल्या देहास जड म्हणणें युक्त असल्यास ) व शिकवणरूपानें या ज्ञानस्वरूपी परमात्म्याचा अवतार ३०० वर्षांनीं नाथांनीं प्रत्यक्ष व महाराष्ट्रानें अप्रत्यक्ष अनुभविला आहे; व जे भाग्यवान असतील ते यापुढें हि अनुभवितील !

या अवतारांत श्रीवाल्मिकांची प्रतिभा, श्रीव्यासांची अधिकारसंपन्नता , भगवंताचें ' स्वधर्म'स्थापनेचें औत्सुक्य व संतांचें जगदुपकारक कारुण्य हीं सर्व एकवटलीं होतीं. या सर्व गुणांची श्रीमत् ज्ञानेश्वरी जी साक्ष देत आहे, तीच श्रीयोगवासिष्ठ हा ग्रंथ हि देतो.

वस्त्वेकैकमपीह वांछितफलप्राप्तेः पदं किं पुनः ।
मद्भाग्योपचयात् असौ समुदितः सर्वे गुणानां गणः ॥




---

## श्रीयोगवासिष्ठ

हें बोलिले वसिष्ठ । म्हणौनि नांव वासिष्ठ ।
यामाजीं श्रेष्ठ । आत्मज्ञान ॥

श्रीयोगवासिष्ठ हा ग्रंथ अवघा ८०० ओवींचा आहे. तेव्हां ३२ हजार मूळ ग्रंथाचें हा ग्रंथ रूपांतर आहे असें म्हणणें केव्हां हि शोभणार नाहीं. हा ग्रंथ स्वतंत्र आहे. श्रीमत् ज्ञानेश्वरी ही जशी स्वतंत्र टीका आहे, तसा च किंबहुना त्या श्रीग्रंथाहून हि हा ग्रंथ अत्यंत स्वतंत्र आहे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं; तथापि महाराजांची प्रतिज्ञा अशी आहे,

माझी प्रतिज्ञा ऐसी । जिये ग्रंथींचीं बोली जैसी ।
निवृत्तिकृपावशीं । पुरो चि लागे ॥

इतकें च नाहीं तर संस्कृताच्या गर्भितार्थाहून ' उणें आगळें ' बोललों तर ' श्रीगुरु लाजविला ' अशी हि उक्ति महाराजांनीं काढिली आहे. स्वतंत्र ग्रंथ तर करावयाचा, परंतु पूर्वील महर्षींस स्तुतिपुष्पें प्रथम वाहून नंतर रचना करावयाची, हें शालीनतेचें उदाहरण मननीय आहे. सारस्वतरूपी महदाकाशाचें शब्दब्रह्मानें महर्षींबरोबरच आपण आक्रमण तर करावयाचें, परंतु अर्जुनानें पितरांचा व गुरूचा अतिक्रम होऊं नये म्हणून जसें भारतीयुद्धांत बाणांनीं त्यांच्या चरणीं प्रथम पूजा अर्पिली, त्याप्रमाणें आपली लीनता प्रकटवीत व

'भाष्यकारातें वाट पुसत'

असें ह्मणत स्वतंत्र रचनेस प्रारंभ करावयाचा, यांतील लीनतेचें कौतुक करावयाचें कां अगाध विद्वत्तेनें आश्चर्यचकित व्हावयाचें!

संस्कृतांतील विविध ज्ञानामृताचा स्वतः आतृप्ति रसास्वाद घेऊन त्याचा त्या त्या कालाच्या लोकस्थितीस अवश्य अशा स्वरूपांत इतरांस हि लाभ व्हावा या हेतूनें साधुसंतांनीं सर्व ग्रंथरचना मराठींत केली आहे. प्रथम प्रथम ही रचना लोकदृष्टीनें झाली,

मऱ्हाटी बोलतां बरवी। सर्वत्र जाणीव मिरवी।
मऱ्हाटी दुर्जनाकरवीं सांडवी। पाषांड पैं ॥
तवं गुरु ह्मणती आयिकिलें। संस्कृत लोकांसी न कळे वहिलें।
तुवां मऱ्हाटिये करूनि सांडविलें। विषयसंग ॥ श्री. यो. वा.

परंतु पुढें मराठींत ग्रंथरचना करणें हा भाषाभिमानाचा प्रश्न झाला.

संस्कृत देवें केली। मऱ्हाटी कां चोरें आणिली।

हे उद्गार लोकदृष्टीचे दर्शक नव्हत, भाषाभिमानाचे द्योतक आहेत; व असें असणें साहजिक च आहे. लोककल्याण जें होणें तें झाल्यानंतर, म्हणजे अवश्यक जें इष्ट तें प्राप्त झाल्यानंतर भाषादिकांच्या अभिवृद्धीबद्दल अभिमान उत्पन्न होणें हें सहज च आहे; पण ही स्थिति शक १५०० च्या कालांतील. महाराजांनीं मराठींत ग्रंथरचना कां केली, तें वर स्पष्ट झालें च आहे.

उद्बोधनाथांचा जो चरित्रवर्णनात्मक अभंग वर दिला आहे, त्यांत श्रीयोगवासिष्ठाचा उल्लेख नाहीं खरा, पण त्यांत श्रीज्ञानेश्वरीवांचून इतर कोणत्या हि ग्रंथांचा उल्लेख नाहीं, तेव्हां श्रीयोगवासिष्ठाचा नाहीं यांत कांहीं आश्चर्य नाहीं. परंतु अनुभवामृताप्रमाणें महाराजांनीं योगवासिष्ठ हि केलें याबद्दल समकालीन संतांचीं वचनें आहेत.

वसिष्ठगीतेची टीका। ग्रंथरचना नेटका।
भावार्थ काढिला श्लोका। ग्रंथरचना दाविली ॥

नामदेवराय

भगवद्गीतेवरी टीका । केली भावार्थदीपिका ।
अमृत अनुभव करूनि निका । योगवासिष्ठ स्वात्मपत्र ॥
( विसोबा खेचर )

श्रीयोगवासिष्ठाची रचना श्रीज्ञानेश्वरीनंतर झाली हें निःसंशय आहे.

तव बोलिला धूर्जटीकुमरु । ह्मणे पारु पारु ।
तुज आह्मीं अभयंकरु । केला सत्य ॥ ३३ ॥
जैं तुवा गीता केली मऱ्हाटी । जै स्तुति केली उमेटी ।
तैं चि तुज कृपादृष्टीं । अवलोकिलें ॥ ३४ ॥ ( श्री. यो. वा. )

'संत व त्यांचे अवतारकार्य' या लेखांत श्रीज्ञानेश्वरीवर्णन करीत असतां, तेथें हा श्रीग्रंथ पूर्ण प्रवृत्तिपर आहे असें विधान मी केलें आहे. हेंच विधान श्रीयोगवासिष्ठास हि पूर्णतेनें लागू पडतें; कारण येथें मूलग्रंथास च आरंभ असा आहे—

"केवलात् कर्मणो ज्ञानात् न हि मोक्षोऽभिजायते ।
किंतूभाभ्यां भवेन्मोक्षः साधनं तूभयं विदुः ॥

इतकेंच नाहीं परंतु, निर्वाणप्रकरणापर्यंत श्रीवसिष्ठांनीं उपदेश केल्यावर श्रीरामांची समाधि लागली तेव्हां

श्रीगुरूंनीं:—

राम राम महाबाहो महापुरुष चिन्मय ।
नायं विश्रांतिकालो हि लोकानंदकरो भव ॥
यावल्लोकपरामर्शो निरूढो नास्ति योगिनः ।
तावद्दृढसमाधित्वं न भवत्येव निर्मलम् ॥ १७ ॥

असें ह्मणून त्यांचें व्युत्थान केलें आहे. याचा अर्थ इतका च कीं, प्रत्येकानें आपापले स्वधर्म-स्वकर्मा-चरण केलें पाहिजे. निवृत्तिपर होणें ह्मणजे सर्व कर्मापासून निवृत्त होणें नव्हे, तर सर्व कर्माचा संभार करूनही कर्तृत्वापासून व ह्मणून फळापासून हि निवृत्त होणें. हा च खरा वेदांत; व तो च पूर्वील संतांच्या सर्व ग्रंथांतून प्रतिपादिलेला आहे.

ऐसें ह्मणौनि वसिष्ठ रामातें थापटि ।
उघडवीं नेत्र फिटे काष्टि ।
तो ह्मणे स्वामि हे आइकता चि गोष्टि ।
जाला आत्मबोधु ॥

आतां कर्मी अकर्मी ऐसें ।
आसु किजे अनुक्रमवशें ।
कर्म होऊनु निर्धारवशें ।
परि मुक्त अकर्म गा ॥

मूळ योगवासिष्ठाचीं वैराग्य-मुमुक्षुव्यवहार-उत्पत्ति-स्थिति-उपशम आणि निर्वाण अशीं सहा प्रकरणें आहेत. महाराजांनीं आपल्या ग्रंथाचीं दहा प्रकरणें केलीं आहेत तीं अशीं:—

(१) सिद्धसंगप्रशंसा (२) शिष्यदूषण (३) सत्‌शिष्यप्रशंसा (४) षट्‌दर्शनविवरण (५) चतुर्युगधर्मविवरण (६) गृहस्थाश्रमनिषेध (७) अष्टांगयोगाविवरण (८) सर्वांतरात्माप्रशंसा (९) प्राणसाकळी (१०) ?

याची वांटणी कशी केली आहे हें स्थूलमानानें पाहिलें तर असें दिसतें. सिद्धसंगप्रशंसा यांत मुळांतील कथांत ज्या ऋषींचीं नांवें आलीं आहेत, त्यांचा व शिवाय इतरांचा उल्लेख केला आहे. सत्‌शिष्यप्रशंसा व शिष्यदूषण यास आधार मुमुक्षु प्रकरणांतील १२ वे सर्गाचा असावा असें वाटतें

स्वमतीव गुणश्लाघी पृच्छको रघुनंदन ।
अहं च वक्तु जानामि समो योगोऽयमावयोः ॥

वैराग्यप्रकरणांतील विशेषतः स्त्रीजुगुप्सा नांवाचा जो सर्ग आहे, त्यावर गृहस्थाश्रमनिषेधाची उभारणी असावी असें वाटतें. तसेंच ८ वा व १० वा अध्याय यांस मूळांत एके ठिकाणीं असा आधार सांपडावयाचा नाहीं. जीवन्मुक्तलक्षणें ठिकठिकाणीं आहेत. त्या सर्वांचा निष्कर्ष काढून महाराजांनीं श्रीगुरुचरणीं अर्पण करण्याकरितां हा हार गुंफलेला आहे; व असें आहे ह्मणूनच या ग्रंथास ‘ स्वतंत्ररचना ’ हें नांव यथार्थ शोभतें. या श्रीग्रंथाचें वर दिल्यापेक्षां अधिक विवेचन देण्याची योग्यता माझी नाहीं तेव्हां त्यास नुसतें नमन करून, श्रीज्ञानेश्वरानंतर योगवासिष्ठाचे मराठींत किती अवतार झाले याचा थोडासा खुलासा करतों.

## योगवासिष्ठाचे मराठी अवतार

मूळ ग्रंथाचीं प्रकरणें वैराग्य, मुमुक्षु, व्यवहार, उत्पत्ति, स्थिति, उपशम व निर्वाण अशीं सहाच आहेत. पुढें ' सारांत ' यांचीं वैराग्य जगन्मिथ्यात्व, मनोजय, वासनाक्षय, आत्ममनन, शुद्धानिरूपण, आत्मार्चन आत्मनिरूपण, जीवन्मुक्ति व निर्वाण अशीं दहा झालेलीं आहेत. **या दोन्ही** सारांवरून मराठी अवतरणें तर झालीं आहेत च परंतु या व्यतिरिक्त आणखीही एकादा निराळा सारभूत ग्रंथ असावा असें इतर टीकांवरून दिसतें. त्या सर्वांचा संकलित विचार करण्याचें योजलें आहे. या टीका मूळ ग्रंथावरून केलेल्या नसून मागें सांगितलेल्या ' लघुयोगवासिष्ठ ' व ' लघुयोगवासिष्ठसार ' या दोहोंपैकीं कोणत्या तरी एकास आधार घेऊन केलेल्या आहेत. यास अपवाद फक्त श्रीज्ञानेश्वरमहाराजांचें योगवासिष्ठ होय. असो. पहिली टीका

**(१) पूर्णानंद शिवराम**

यांची होय. ' लघुयोगवासिष्ठसार ' यांतील प्रत्येक श्लोकावर एक, फार तर क्वचित् दोन व निरनिराळ्या वृत्तांत अशा श्लोकांची ही आटपशीर व सुंदर टीका आहे. या गोड व अप्रसिद्ध टीकेचा मासला वाचकांस द्यावयाची बलवत्तर इच्छा होते, परंतु मग हात आटपणें माझ्या इच्छेच्या बाहेर जाईल व त्यानें लेखाची मर्यादा उल्लंघेल, ह्मणून भीति वाटते. तथापि थोडें साहस करतो च! सर्व च जेथें अमृत आहे तेथें बुडी मनसोक्त मारण्यास काय हरकत आहे?

जंववरि तुजमाजि चित्त हें खेळताहे ।
तवं शुभअशुभेंसीं दृश्य तूतें दिसों ये ।
स्वक्रिय उगम पाहे जेधवा चित्त रामा ।
सहज चि मग राहे ग्रासुनी रूपनामा ॥

किती गोड, किती अर्थपूर्ण, परंतु किती सुलभ हा श्लोक आहे!

दुसरा पहा—

दूर बहुत चि पण निकट चि आहे । जवळि च पण तो धरिला न जाये ।
निर्मळ निष्कळ व्यापक देहीं । तो मज कळला गुरुचे पायीं ॥

येकला चिद्‌घनु येक सीतापति । दाटुनी संचला वेगळा या भूतिं ।
जेविं नाना जळीं चंद्रमा बिंबला । तद्विकारें कदा नाहिं तो शिंतला ॥
दोरातुनी सर्पता हे उदेली । जाणों जातां त्याच दोरीं लपाली ।
तैसा आत्म्याहूनि हा भेद जाला । आत्मज्ञानें आत्मरूपीं निमाला ॥
या तनूदेवळामाजि रे जागतो । सर्व साक्षी सदा देव हा गर्जतो ।
नेणिवेचेंचि निर्माल्य हें सांडिजे । तो च मी या चि भावें सदा पूजिजे ॥

पुरें, जों जों अधिक द्यावें तों तों विषयभोगेच्छेप्रमाणें तृप्ति नाहीं. लालसा अधिक च वाढते.

याच सुमारास झालेली दुसरी टीका म्हणजे

(२) माधवदास नारायणांकित

यांची होय. **हरिदासांनीं** आपल्या टीकेस आधार **योगेश्वरांच्या** टीकेचा आहे म्हणून स्पष्ट खुलासा केलेला आहे. **रंगनाथांनीं** वसिष्ठ-साराची ही टीका आहे असा मुग्धत्वानें उल्लेख केलेला आहे. **माधव-दासांनींहि** तसाच उल्लेख केलेला आहे. परंतु रंगनाथांनीं व माधव-दासांनीं दिलेल्या मूळ श्लोकांत पुष्कळ फरक आहे. यावरून हे 'वसिष्ठसार' भिन्न तरी असावेत अथवा रंगनाथांनीं आपल्या बुद्धीनें-च स्वतः 'सार' काढलें असावें. कारण लघुयोगवासिष्ठसार म्हणून जो एक २२५ श्लोकांचा ग्रंथ हल्लीं प्रसिद्ध आहे त्याचा आधार माधव-दासांस आहे हें स्पष्ट दिसत आहे. आणि 'लघुयोगवासिष्ठ' हें कांहीं रंगनाथांच्या टीकेचें मूळ नाहीं.

ही टीका शक १५१४ नंदन संवत्सरीं अश्विन वद्य ८।९ बुधवार या दिवशीं संपूर्ण झाली असा उल्लेख आहे. माधवदासांचा गुरु नारायण हें नांवावरून च उघड होत आहे. ग्रंथ वऱ्हाडांत पंच-ग्राम येथें झाला असा उल्लेख ग्रंथांतीं माधवदासांनीं केला आहे. मूळचें नांव कृष्ण असून गुरूनीं माधवदास हें नांव दिलेलें आहे. पुढें

(३) अनामिक

या नांवाच्या तिसऱ्या टीकेबद्दल विचार करूं. रंगनाथस्वामी निगडी-कर व रंगनाथ मोगरे यांनीं दोघांनीं हि 'योगवासिष्ठा' वर टीका

केली असली पाहिजे असें जें पुढें मी म्हणणार आहे त्याचें कारण मला नुकतीच योगवासिष्ठावर आजपर्यंत अप्रसिद्ध असलेली अशी एक टीका उपलब्ध झाली आहे. मात्र तिच्यांत ग्रंथकाराचें नांव कोठें-हि नाहीं. म्हणून तिला मी अनामिक टीका म्हणतो.

या टीकेचा योगवासिष्ठांतील अखेरच्या निर्वाण प्रकरणाचा फक्त पूर्वार्ध व तो हि अगदीं अपुरा असा मिळाला आहे. आजपर्यंत उपलब्ध असलेल्या कोणत्याहि टीकेंत निर्वाण प्रकरणाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन विभाग केलेले नाहींत. सर्वांत विस्तृत अशा हरिदासकृत टीकेंत हि हे दोन भाग नाहींत परंतु या नवीन उपलब्ध झालेल्या टीकेंत हा भेद केलेला आहे हें स्पष्ट दिसतें. तसेंच या टीकेच्या विस्ताराची हि थोडीशी कल्पना येण्यास उपलब्ध झालेलीं त्रोटक प्रकरणें पुरेशीं आहेत. हरिदासकृत टीकेंत पूर्वार्ध व उत्तरार्ध मिळून निर्वाण प्रकरणाचे फक्त १७ च सर्ग आहेत. या टीकेंत फक्त पूर्वार्धाचींच २५ प्रकरणें आहेत. मूळ ग्रंथाकडे पाहिलें ह्मणजे एकटा उत्तरार्धच इतर सबंध ग्रंथाएवढा आहे. तेव्हां या टीकेंत पूर्वार्धाहून उत्तरार्ध बरा च विस्तृत असला पाहिजे असें अनुमान काढण्यास कांहीं हरकत नाहीं. ह्मणजे नुसत्या निर्वाणप्रकरणाचे ७५ पावेतों सर्ग असणें असंभवनीय नाहीं. तसें च प्रत्येक प्रकरणाचा विस्तार ही थोडाथोडका नाहीं. प्रत्येकांत कमींत कमी ७५ तरी ओंव्या आहेत.

या टीकेची ओंवी साडेतीन क्वचित् चार चरणी असून शुद्ध आहे, विषयाची मांडणी सरळ, भाषा भेदक, व अर्थपूर्ण अशी आहे.

स्वसदनींचें चित्र पुसिलें । स्वप्नकुटुंब नाश पावलें ।
त्याचें दुःख कवणां जालें । तैसें चि ज्ञान्या हें शरीर ॥

अशा तऱ्हेची रचना, एवढा मोठा ग्रंथभर, सर्वत्र श्रीदत्तास व क्वचित् श्रीपांडुरंगास नमन, या वरून कदाचित् ही रंगनाथी टीका असावी, व ते रंगनाथ, रंगनाथ निगडीकर असावेत असें वाटतें. परंतु उपलब्ध प्रकरणांत कोठें हि आरंभीं अगर शेवटीं ग्रंथकारानें आपला अगर

आपल्या गुरूचा नामनिर्देश केलेला नाहीं. हा जितका चमत्कार आहे तितकें च आमचें दुर्दैव हि आहे. या नंतरचें चवथें योगवासिष्ठ

**( ४ ) रंगनाथांचें**

होय. हें योगवासिष्ठ बरेंच विस्तृत आहे. ह्मणजे एकंदर ग्रंथ सुमार ६ हजारांहून किंचित् अधिक आहे. यथार्थदीपिकाकर्ते वामन पंडित, यांचेप्रमाणें ग्रंथरचनेंत पांडित्य बरें च आलेलें आहे. श्रुतिस्मृतीचे आधार व अवांतर प्रमाणें यांची बरी च रेलचेल आहे. परंतु वामन पंडितांच्या कृतींत व या टीकेंत फरक असा आहे कीं, दीपिकेपेक्षां येथील ओवी आटपशीर असून विवेचन जास्त सुलभ व सुविज्ञेय आहे.

ओवी श्रीनाथांच्या कांहीं ग्रंथांतील ओवीप्रमाणें साडेचार चरणी असून, पुष्कळशी उत्तानार्थक आहे. ग्रंथांत सर्वत्र सहज वक्तृत्व दृग्गोचर होतें; व मराठी भाषा श्रीनाथांच्या लालनेनें आधुनिक शब्दावगुंठन घेऊन जशी दिसावी तशी दिसते.

परंतु या ग्रंथाच्या कर्त्यासंबंधींचा प्रश्न अद्याप संदिग्ध असा च राहिला आहे आणि आजच्या या टिप्पणीनें त्याच्या संदिग्धपणांत मी आणखी थोडी भर च टाकीत आहे. प्रश्न असा कीं--

**हे रंगनाथ कोण ?**

कावेरीतटनिवासी एक रंगनाथ, रंगनाथ नरहरी दुसरे, रंगनाथ मोगरे नाशिककर व रंगनाथस्वामी निगडीकर असे चार रंगनाथ झाले असल्याचे मला माहित आहेत. पैकीं योगवासिष्ठाचें कर्तृत्व शेवटच्या दोन रंगनाथांच्या वांटेस आलेलें आहे. कित्येक रंगनाथ मोगरे हे योगवासिष्ठकार आहेत ह्मणून ह्मणतात, व आपल्या ह्मणण्याच्या समर्थनास मोगरे यांच्या ‘ चिद्सदनानंदलहरी ’ तील एक ओवी देतात ती अशी--

हें वासिष्ठसाराचें निरूपण । जालें असे पैं संपूर्ण ।
त्या उपरी ग्रंथराज निर्माण । गीतानामें संपूर्ण जाला असे ॥

यावरून मोगरे रंगनाथ यांनीं च हा ग्रंथ केला, असें या पक्षाचें ह्मणणें

आहे. रंगनाथस्वामींची गुरुपरंपरा जी सहज-पूर्ण-निजानंद ही आहे तिच्या आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें या ग्रंथांत सर्वत्र उल्लेख असल्यानें हा ग्रंथ निगडीकरांचा आहे असें दुसऱ्या पक्षाचें ह्मणणें आहे. नाहींतर सहजानंद-पूर्णानंद, अगर सहजानंद यांचा प्रत्येक प्रकरणाच्या शेवटीं उल्लेख कां असावा असा हि एक प्रश्न आहे.

**रंगनाथ मोगरे** यांची परंपरा अशी.

वासुदेवानंद-परमानंद-वैकुंठानंद-कृष्णानंद-**रंगनाथ**-काशिराज-विश्वनाथ

यांचा काल शक १५३० हा.

**रंगनाथ निगडीकर** यांची परंपरा आनंदसांप्रदायी च असून

सहज-पूर्ण-निजानंद-**रंगनाथ** ( सहजानंदाचे मागील कांहीं पिढ्या येथें अनवश्यक ह्मणून दिल्या नाहींत. )

यांचा काल शक १५३४–१६०६

तेव्हां दोन्ही रंगनाथ कांहीं कालपावेतों समकालीन असावेत. परंतु रंगनाथस्वामी निगडीकर यांची ' संतमालिका ' प्रसिद्ध झाली आहे, तींत ते शेवटीं

काशीराज......मुनी । विश्वनाथस्वामी पूर्णज्ञानी ।

असा रंगनाथ मोगरे यांच्या पुढील दोन पिढ्यांचा अगदीं स्पष्टतेनें व अत्यंत आदरानें उल्लेख करतात, तेव्हां '**योगवासिष्ठ**' हा ग्रंथ रंगनाथ मोगरे यांचा आहे असें मानल्यास, रंगनाथस्वामींचे वेळीं कांहीं फारसा कालातिपात झाला नसावा कीं ज्या वेळीं एक तर इतर साधुसंतांच्या ग्रंथांत त्याचा उल्लेख नसावा, अगर रंगनाथस्वामींनीं खुशाल दुसऱ्याची कृति आपले नांवावर प्रचलित करावी. परंतु हा घोटाळा तेव्हांचा नसावाच. याचें कारण एक च दिसतें, तें हें कीं, दोन्ही रंगनाथांनीं '**योगवासिष्ठा**'वर टीका लिहिली असावी व प्रथम छापतांना अगर लेखनप्रसंगीं हा भेद लक्षांत न राहून हस्तदोष घडले असावे, कारण आज ' रंगनाथ मोगरे ' यांचें जें वासिष्ठ मुद्रित आहे त्यांत कित्येक प्रकरणीं रंगनाथस्वामींच्या परंपरेचा उल्लेख कोठें तरी मध्येंच

केलेला आढळतो व पुन्हां विषयाचें विवेचन केलेलें आढळतें. असो. या घोटाळ्यांत जास्त खोल न शिरतां आपण पुढील पांचवी टीका जी

## (५) हरिदासांची

तिकडे वळूं. ही टीका हरिहराचार्यांच्या लघुयोगवासिष्ठावरील योगेश्वर यांच्या स्वात्मानुभव नामक टीकेच्या आधारानें शक १६१० वैशाख शुद्ध ७ गुरुवारीं संपविलेली आहे.

श्रीज्ञानेश्वरीचा तदनंतरच्या इतर सर्व मराठी ग्रंथरचनेवर किति परिणाम झाला आहे याचें ज्यास मापन करणें असेल त्यानें श्रीएकनाथ, रंगनाथ आदि मान्यसंतांचे मान्यतर ग्रंथ अवलोकन करावे ह्मणजे सहज समाधान होईल. हरिदासांच्या या टीकेंत हि सर्वत्र श्रीज्ञानेश्वरीचाच भास होतो. प्रथम मुळीं आपले टीकेस नांव च हरिदासांनीं ' भावार्थ दीपिका ' दिलें आहे.

ते हे भावार्थदीपिका । बालबोधिनी सुंदर टीका ।
अर्थान्वबोधें आली पिका । जे कां पीठिका ब्रह्मविद्येची ॥

हें झालें समाननामाचें. समानविचार असण्यांत फारसें महत्व नाहीं, कारण श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं नवीन विचार म्हणजे नवीन उपमा अथवा रूपक मराठी भाषेंत फारच क्वचित् ठेवलें असेल, परंतु हरिदासांनीं तर समानविचार समानशब्दांत दिले आहेत. अशा रचनेंत त्यांनीं आपले गुरु जे श्रीएकनाथ त्यांचेंच अनुकरण केलें आहे.

थोडेसे मासले देतों,

बालकाचे बोल पुरति । मनोरथ विजई होती ।
माह्येरें श्रीमंते होती । कृपामूर्ति तुम्हां ऐसीं ।
तुमचा अनुग्रहो चंद्रमा । करो मति माझी पूर्णिमा ॥
तुमचे तुम्हीं कराल पुरतें । सज्जना माजि सरतें ॥
दीक्षिताधि लाजिरवाणें । देह धरणें कर्मानुसार ॥
कवडा वेचिलिया गांठिचे । द्वार चेंपु नये वेश्येचें ॥

यांतील शब्द व अर्थसादृश्य किती आहे हें श्रीज्ञानेश्वरीचा ९ वा अध्याय जो वाचील त्यास सहज समजण्यासारखें आहे. श्रीज्ञानेश्वरीचा

दृढाभ्यास जो नाथांचे एकादशस्कंदांत दृग्गोचर होतो तीच भावना ही टीका वाचीत असतां हि होते. नाथपरंपरेचा हा विशेषच दिसतो. असो, या भावार्थदीपिकेची ओवी साडेचार चरणी असून नीटनेटकी व आटपसर अशी नाहीं, तथापि ती सुबोध आहे. श्रीएकनाथपरंपरेस अनुसरून या ग्रंथांतील श्रीगुरुभक्ति अनुपमेय आहे. प्रत्येक सर्गाचा बराचसा भाग श्रीगुरुस्तुतीनें भरलेला आहे; त्यामुळें ग्रंथास विशेष शोभा व त्याचे वाचनपठणांत अत्यन्त प्रेम उत्पन्न होतें.

यापुढील जवळ जवळ अर्धशतकाच्या नंतरची टीका म्हणजे कालानुरोधानें अगदीं अलीकडील

## ( ६ ) व्यंकट

कवीची होय. ही सहावी व ज्ञात असलेल्यांत शेवटची आहे.

ही टीका बहुधा अनुष्टुभ् वृत्तांत असून क्वचित् इतर वृत्तें हि आहेत. तिचीं प्रकरणें एकंदर १० आहेत. काव्यसंग्रहमालेंत ही टीका प्रसिद्ध झाली आहे, परंतु तेथें मूळ दिलें नसल्यानें, ही 'लघुयोगवासिष्ठसार' या ग्रंथावरून असावी असें निश्चिततेनें सांगतां येत नाहीं. एकंदर १० प्रकरणें ६७० अनुष्टुभांत आणावयाचीं, यामुळें ग्रंथ जरा दुर्बोध झालेला आहे. परंतु विषय च तसा असल्यानें विशिष्ट प्रतिभा अंगीं असल्यावांचून तो सहज सुबोध होणें शक्य नाहीं, तेथें ग्रंथकाराकडे दोष येत नाहीं. प्रत्येक प्रकरणाचे शेवटीं ' अवतारिका ' जोडून तींत त्या त्या प्रकरणाचें विशेष स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न केलेला आहे तो स्तुत्य आहे.

व्यंकटांनीं आपल्या ' श्रुतिदीप ' ग्रंथांत आपली गुरुपरंपरा सहजानंद–ब्रह्मानंद–आनंदनाथ–मंगेश–आत्माराम, अशी दिली आहे असें संग्रहकार ह्मणतात; यावरून व ग्रंथलेखन शक १७२४ दिला असल्यानें, व्यंकट कवि हे शक १६०० चे सुमारास झाले असावे असें वाटतें.

याप्रमाणें एकंदर ६ टीका आहेत व प्रथमची ७ वी श्रीज्ञानेश्वर महाराजांची होय. तीच हा ग्रंथ महाराजांच्या शब्दाप्रमाणें

ब्रह्म बोलिजें चिद्रूप । ब्रह्म ह्मणिजे नादरूप ।
तेया ब्रह्मा माझें वाक्पुष्प । अर्पित हो ॥

अशी प्रार्थना करून व

सकळ सुखें वर्तो जन । सकळीं परमेश्वरीं मन ।

हें चि पसायदान त्या प्रभूजवळ मागून, विराम पावतों.

वर्षप्रतिपदा
शके १८३६
आनंदसंवत्सर

गो. का. चांदोरकर.



श्री

# ॥ योगवासिष्ठ ॥



॥ ॐ परमात्मने नमः ॥

नमन भवसिंधूतारका[1] । सर्वदुरितहारका ।
प्राप्तिबोधकारका । विघ्नेश्वरा ॥ १ ॥
तुं रचनादी सर्व कर्ता । अज्ञान अंधकारु हर्ता ।
तुं बोधु करिसि पूर्णता । स्वप्रकाशिचा ॥ २ ॥
तुं परमात्मपादिचि भूस । अनर्घ्यरत्नांचि मांदुस[2] ।
तुं स्वस्वरूपप्रकाश । निरंतरु ॥ ३ ॥
तुं कैवल्यदाता सुखतरु । प्राप्तिकथनीचा सद्गुरु ।
तुं स्वस्वरूपिचा पारु । स्वक्रिय दाविसि ॥ ४ ॥
तुझी कृपादृष्टि ज्ञानबोधी । परस्वरूपातें साधी ।
निजतत्व वेधी । स्वप्रकाशें ॥ ५ ॥
जैं तुं प्रकटीसि आपूला विवेकू । निरशीसी दुर्गसंसार भयार्णकू ।
विश्ववंद्या वरिष्ट विनायकू । विश्वव्यापि ॥ ६ ॥
तुझि कृपादृष्टि उघडे । तरि ब्रह्मविद्याभांडार उघडे ।
उन्मेषाँसि[3] पूट चढे । प्रज्ञामतीचे ॥ ७ ॥
नमन संसारसर्वज्ञवेद्या । तुं विघ्नसर्वांसि आद्या ।
तुं विवेकमार्गीं ब्रह्मविद्या । प्रकाशिसि ॥ ८ ॥

---

१ मूळ पोथीस येथून आरंभ आहे. ओवीचा आंकडा ९ असा आहे व त्यामानानें पुढील आंकडे आहेत. परंतु दुसरी पोथी जी बरीच आधुनिक उपलब्ध झालेली आहे तिच्यांत आरंभ याच ओवीपासून असल्यानें मूळच्या ८ ओवी कोणत्या हें समजण्यास मार्ग नाहीं. सबब ही च ओवी प्रथमची समजून त्यामानानें ओवीचे अंक दिले आहेत. २ पेटी. ३ ज्ञान.

तुं परवस्तूचा मोळा[1] । सर्व सुखराचा वाळा ।
प्राप्तिपद दावीसि डोळां । अवळिळा चि तुं ॥ ९ ॥
तुं आनंदाचा आनंदु । उद्बोधाचा उद्बोधु ।
तुं ब्रह्मविद्येचा युवनमदु । बालचंद्रु ॥ १० ॥
तुं नवरसनाट्यनृत्या । वाद्यविद्यामयप्रीत्या ।
तुझे सर्व हि भृत्य । सुरासुर ॥ ११ ॥
मिनले सुर सर्व समस्त हि । योजीतां अभिप्राय प्राप्ति ।
त्रैलोक्य आदि तुज नमीती । श्रेष्टा ह्मणौनी ॥ १२ ॥
कैळास पर्वती इशान्यु । आधीं वंदी गजाननू ।
अपार अर्थु गहनु । काये वर्णु ॥ १३ ॥
तुं अष्टसिद्धिचि जोडि । कल्पतरुचि वांडि[2] ।
ज्ञानामृतसागरा ची गोडी ।
तुं स्वकीय मुर्छना फूडी । मोक्षपदाचि ॥ १४ ॥
नमन बाळचंद्रसाध्या । कृपा कथिसि ब्रह्मविद्या ।
निमिक्षें[3] ग्रासिसि अविद्या । उर्धदृष्टि ॥ १५ ॥
तुझि करणी अनादी । अपार रचीली आदि ।
मग तृतीयें अंशु रचिला अनादि । सीवरूपू ॥ १६ ॥
तेथुनि रचिली आर्या । किं दुहिता ते चि भार्या ।
तेथुनि ज्योति जन्मली सूर्या । कोटि प्रकाशें ॥ १७ ॥
तमस्वरूप[4] कळा समस्ति । रचिली ज्योती पासौनि प्रकृती[5] ।
तेथौनि प्रणवबीज संविति । सुतेजसा ॥ १८ ॥
तेथुनु जाला मारुतु । मारुती जन्मला रुद्रु मूर्तु ।
रुद्रमुर्तिं जन्मला स्तनुनपातु । षडतरां किर्णीं ॥ १९ ॥

---

१ ओझें, परंतु येथें मद्गळा, मगज, असा अर्थ असावा. किंवा ‘ मेळा ’ असावा. श्रीज्ञानेश्वरींत ‘ मेळावा ’ असा शब्द ‘ मेळा ’ या अर्थी आलेला आहे. पहा अमृतानुभव ७×१४२. २ बाग, वन. ३ ‘ ष्य ’ ऐवजीं ‘ क्ष्य ’ या लेखनकारानें सर्वत्र दिला आहे. ‘ शिष्य ’ हा ‘ सिक्ष ’ असा लिहिलेला फार आढळतो. ४ तमोगुण. ५ माया, मूळप्रकृति.

स्तनुनपाताचा आत्मजु । जो बोलीजे गरुडध्वजु ।
अवर्णोदकीं[1] अब्जु । जन्म जालें ॥ २० ॥
अब्जापासौनि पिंडब्रह्मांड । चतुर्विध भूतग्राम प्रचंड ।
सप्तद्वीपावती[2] नवखंड । पृथ्वीपर्वत* ॥ २१ ॥
इत्यादि रचना आभासे । पूनरपि अनुक्रमें ग्रासे ।
तुज आंतु होये जाये आपैसें[3] । परि तुं नित्यु ॥ २२ ॥
ऐसीं सृष्ट्यादि रचनां । तुजपासौनि गजानना ।
विश्वतारका गहना । येकदंता ॥ २३ ॥
श्रुती स्मृती निघंट व्याकरणें । आगम धर्म पूराणें ।
भरतु काव्य नाटक करणें । कोक जोतीस ॥ २४ ॥
निरुय शास्त्रचिकिछिका । विविधशास्त्र अनेक ।
सर्वश्रेष्टा विनायका । धात्रया तुं ॥ २५ ॥
विघ्न नांवें अंधकारु । त्याते ग्रासावेया तुं दिनकरु ।
रचने आदि आगोचरु । विघ्ननाशू ॥ २६ ॥
विघ्न चि नावें पर्वतु । तेयासि छेदावेया तुं वज्रघातु ।
दुरितहर्ता येकदंतु । विघ्नेश्वरु ॥ २७ ॥
विघ्नगजु उन्मतु भारि । त्यासि ग्रासावेया तुं केसरि ।
तुं बैसविसी मुक्तिचां द्वारीं । स्वप्रकाशें ॥ २८ ॥
विघ्न व्याळू[4] तुं द्विजकूळु । विघ्न अब्जु तुं वडवानळु ।
विघ्न मेघु तुं मळयानिळु । चंडवातु ॥ २९ ॥
ऐसा समर्थु तुं विनायका । विषयसंसारतारका ।
तुझी कृपा आधिष्टी तरि ग्रंथटिका । सिधि जाये ॥ ३० ॥

---

१ 'आवरणोदक'=प्रलयोदक. २ द्वीपवती. * नववे व दहावे अध्यायांत योगाचें वर्णन करीत असतां उत्पात्ति व लय दिले आहेत तेथें जी उत्पात्ति दिली आहे तिच्याशीं ही येथें दिलेली ताडून पहावी. तेथील परंपरा अशी:—पर-लयनु—कृतिपकु—समेशु—आर्यानिर्देशु—ज्योतिसांख्यु—समारि--गुणकृत--कृतिवासा--उपेंद्र--नीद्राहीनु--पिंडब्रह्मांड. ३ सहज. ४ सर्प.

तुझि चरणसेवा गोमटी । ते परमतत्वातें प्रकटी ।
नउनी बैसवि पाटीं[1] । मोक्षश्रियाचां ॥ ३१ ॥
तुं पूर्णतत्वतरणिं । वैराग्यरत्नाची खाणि ।
तुं कृपा करिसि तेथ आणि । कवण ठेवी ॥ ३२ ॥
तवं बोलीला धुर्जेटी कुमरु । ह्मणे पारु पारु[2] ।
तुज आह्मीं अभयंकरु । केला सत्य ॥ ३३ ॥
जैं तुवां गिता केली मऱ्हाटी । जैं स्तुति केली उमेटी[3] ।
तैं चि तूज कृपादृष्टी[4] । अवलोकीलें ॥ ३४ ॥
निवृत्तिनाथु तो माझा वेषू । तेणें तुज कथिला अध्यात्मविवेकू ।
तुज न बाधी भयार्णकू । संसारु हा ॥ ३५ ॥
आणिक हि येकू आमचा वरु । जो गीतावासीष्टीं तत्परु ।
त्यासी न बाधी भवसागरु । पाउ मोक्षपद ॥ ३६ ॥
मग ह्मणे ज्ञानदेवा आरजा[5] । नमीं तुं ब्रह्मतनया शारजा ।
आह्मासि त्वां[6] दुजा । भाउ नाहिं ॥ ३७ ॥
आतां नमन माते सारस्वती । तुं परम योगिणि मुक्ति ।
तुझें करणें अकळशक्तिं[7] । दिव्यरूपे ॥ ३८ ॥
विरींचि जो चतुर्मुखु[8] । तो परब्रह्माचा वेषू ।
तो तुझा आजा विशेषू । निर्धारु हा ॥ ३९ ॥
अनुक्रमें बोलीजेसि नाती । उभयगती सून ह्मणती ।
या खूणां जे जाणती । ते आत्मज्ञानीये ॥ ४० ॥

---

१ श्रीज्ञानेश्वरींत 'बैसवी पाटीं । मोक्षश्रियेचां' ॥ असें आहे. २ पहा श्री ज्ञा. 'वक्तृत्व गोडपणें । अमृतातें 'पारु' ह्मणे" । १३-३. ३ पुष्कळ, अमूप. ४ तृतिया 'दृष्टि' अशी ऱ्हस्व 'इ' कारांत आहे. ५ हा शब्द संबंध श्रीज्ञानेश्वरींत नाहीं. श्रीदासबोधांत आहे. 'श्रेष्ठ' 'आर्य' असा याचा अर्थ आहे. ६ स्त्रीलिंगि तृतियेचें रूप. ७ कळण्यास अशक्य. ८ ब्रह्म व माया यांचेपासून ईश्वर व त्याची भार्या अविद्या जी जग प्रसवतें. चतुर्मुख हा जर 'परब्रह्माचा वेषू' तर 'अविद्या' ही त्याची सून हें उघड आहे. शारदा ह्मणजे अविद्या.

आणिकें येकें अर्थे पाहातां । चतुराननु तुझा जनीता[1] ।
तुं त्याची जनीतां[2] । हें नवल थोर ॥ ४१ ॥
असो हें तुं गितनृत्य रंगिचि जाणि। तुं नवरस नाटकाचि खाणि
अनंत प्रपंचाची विनवणी[3] । तो तुझा खेळु ॥ ४२ ॥
तुझा कृपाकटाक्षु गोमटा । तो लावी प्रेमतत्वाचीया वाटा ।
छेदुनी सांडी फाटा । संसाराचा ॥ ४३ ॥
तुझा कृपाभरु तो नीपूणु । अभीष्टी परमार्थिची खूण ।
तरि काष्टु कामु आंकणां[4] । पडिला चि असे ॥ ४४ ॥
जरि अवलोकीसि कृपा करुनि । तरि तुटे भवार्णवभ्रमाणि
गुणनिर्गुणांची करणीं । तुं चि जाणसी ॥ ४५ ॥
तुझीये रचनेची थोरी । ते काई वर्णु ॐ सुंदरी ।
वेद दरूसणें उदरीं । तुझां माते ॥ ४६ ॥
नमन आदिशक्ति । तुं परशिवाशक्तिचि प्राप्ति ।
तुज वंदून वर्तती । मुक्ति चतुर्विधा ॥ ४७ ॥
तुं आगमासि निर्गमा । वेदविद्या आगोचरक्षमा ।
तुं दिव्यकांति स्यामां । योगमार्गिचि ॥ ४८ ॥
तुं विवेकदुर्गाची चरि । ज्ञानमूर्तीची[5] भरोवरि[6] ।
निराळंबपक्षीं खेचरी[7] । क्षमारूप ॥ ४९ ॥
तुं प्रबोधचंद्राची कळा । आत्मनाथयोगियाची मेखळा ।
तुंवा अवलोकितां अवलीळा । आगम वेदशास्त्रे ॥ ५० ॥
तुं वैराग्यकुसुमांचा आमोदु । प्राप्तिकथनीचा बोधु ।
दर्शनउपदर्शना तुझा सोधु । नव्हे चि माते ॥ ५१ ॥

---

१ ‘दुहिता’ चे ऐवजीं ‘जनिता’ पडलें आहे. वरच्या टीपेनें हें कोडें उकलेल. २ ‘जानी’ या संस्कृत शब्दाचा अर्थ ‘पिता’ असा आहे. पण येथें ‘माता’ असा अर्थ घ्यावा. ३ विणावणी असा श्रीज्ञानेश्वरींत शब्द आहे. अर्थ—वीण. ४ आंकण=खडा, माति. परंतु येथें आंकणां हें क्रियाविशेषण आहे, तेव्हां त्याचा अर्थ ‘आडवें’ असा घ्यावा. ५ ‘अमृत’ हें वहुधा या लेखकानें ‘अमूर्त’ असें लिहिलेलें आढळतें. त्यावरून येथें ‘ज्ञानामृताची’ असें पद इष्ट आहे. ६ सामुग्रि. ७ ‘खेचरी’ मुद्रा.

तुझा कूमरु सुलेखू । जया नांव बोलीजे उलेखू ।
तो की नीमिक्षा माझी पूरुषू । बोलता जाला ॥ ५२ ॥
तवं बोलीली सारदा माता । आरे उघड सांगतोसि गोप्य कथा
आणिकीपरि स्रवितां । तुज कवण वारितसे ॥ ५३ ॥
तरि तुझि बोलती कैसी । अद्भुत प्रकटली जोती जैसी ।
तुं कळा कळी जाणसी । आत्मबोधाचि ॥ ५४ ॥
आह्मीं जाणो तुझी कळा । ह्मणतां प्रकृती आणितासि बळा ।
तुं केवळ अंकारे डोळां । देखासि ना ॥ ५५ ॥
ॐकारु तुझेया शब्दाचा । ऱ्यां जाणितला परावाचा ।
तो चि वो चित्ताचा । स्छानविशेषू ॥ ५६ ॥
तुं टेंकतासि रुद्रकरणिं । ह्मणितालियां येतासि नमगुणिं ।
बूधी आठवी नीपूणीं । ह्मणतां येतासि तेजा ॥ ५७ ॥
तुझी ईछा अनवर । वरि मनन करि स्छिर ।
आपरुषीं करीतासि व्यापार । अनेकधा ॥ ५८ ॥
आॐ वर्तीजे राजसा भावीं । वरि साभीळाषू धरिजे जीवीं ।
तुझी कृपा बरवी । काये वर्णु ॥ ५९ ॥
ऐसी रचना बरवी । करुं जाणसी शारदे देवी ।
पुनरपी रचना स्वभावी । करु लागसि ॥ ६० ॥
मग तेज प्रकटे । तेणें आपपृथ्वी आटे ।
यां दोहीं लयो घटे । रुद्रकिर्णीं ॥ ६१ ॥
प्रकटलेयां तेजतराणि । सप्तधातुचि होये आटणी ।
ऐसीया प्रस्णांचि विवंचनी । संत जाणती ॥ ६२ ॥

---

१ एका 'सुलेखा' चा अर्थ उन्मेख=ज्ञान असा आहे. २ सांगतोस. ३ 'बोलती'=वाणी. अथवा बोल, ती, अशीं भिन्न पदें. लिंग लक्षांत ठेवण्यासारखें आहे. येथपासून श्रीशारदेची पुन्हां स्तुति आरंभिली आहे, ती ७९ पावेतों. ४ स्त्रिलिंगी क्रियापदाचें रूप लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

सुवर्ण डांहि[1] पडे । तरि अधीक पूट चढे ।
दग्धानंतरें भस्म घडे । ऐसें कहिं नव्हे ॥ ६३ ॥
जारि तापे षडतरां किरणी । तारि सुवर्णाचें होय पाणि ।
त्याची होये शोषणीं । चंडवातें ॥ ६४ ॥
ऐसीया सप्तधातु आटती । मेरु आदि करुनी फुटती ।
कूट होती । चंडवातें ॥ ६५ ॥
तेजें भस्म केलें । तें चंडवातें अंतरीक्ष नेलें ।
तेजसहीत ग्रासलें । जालें नेणो काई ॥ ६६ ॥
ऐसा चंडवातु भारि । तो आटला अंबरीं ।
तें सामावलें उदरीं । प्रकृतीचां ॥ ६७ ॥
यैसिया प्रकृती अशेषी । त्या आटलीया पुरुषीं
त्यातें ग्रासीतु शेषीं । आद्याशक्ती ॥ ६८ ॥
यैसी आटणि बरवी । करूं जाणसी शारदे देवी ।
पुनरपी रचनां स्वभावीं । करु लागसी ॥ ६९ ॥
तु ॐ कृपादृष्टीचेनी जीवनें । वरिषाॐ करिसिल हंसवाहिने[2]।
तरि ग्रंथद्रुमउद्यानें । विस्तारती ॥ ७० ॥
तुं हंसवाहनआनेया[3] । विणावाद्यप्रीया ।
नमीली ब्रह्मतनया । सरस्वती ॥ ७१ ॥
मग संतोषौनु ह्मणे सारजा । आइक पां निवृत्तिनाथआत्मजा।
तुज वरु असे सहज । गितावसिष्ठिं ॥ ७२ ॥
आतां नमीन सद्गुरु । निवृत्तिनाथ कृपासागरु ।
भवसमुद्रिचें तारुं । कृपानिधि ॥ ७३ ॥
बाहीजुं[4] भीतरु काहिं । पाहातां आथिचि नाहिं ।
हें बोलणें चि पाहिं । उपाधिरुप ॥ ७४ ॥

---

१ दाहीं–अग्नींत. हें शुद्ध मराठी रूप आहे. २ श्री ज्ञानेश्वरमहाराजांचे गणपति षड्भुजांचे सिद्धिविनायक असून श्री शारदा हंस (मयूर नव्हे) वाहिनी आहे. ३ हें रूप फार च चमत्कारिक आहे. 'आनय' =आण. आनया=आणली जाणारी (स्त्री) हंसाच्या (स्वरूप) वाहनानें आणली जाणारी, हंसवाहना. ४ बाहेर.

त्रिभूवन सचराचारिं । येकू सद्गुरु चि तारी ।
अन्यथा संसारीं । सुटीका नव्हे ॥ ७५ ॥
जी तुं ज्ञानपूर्ण योगेश्वरु । किं परम वस्तुचा अवतारु ।
मायाझुलीचा विस्तारु । निरशिसि तुं ॥ ७६ ॥
तुझा कृपाकटाक्षु तारि । दावि मुक्तिपंथाची पाईरी ।
तुमतें सेविलेयां संसारिं । उरीजे नां ॥ ७७ ॥
तुमची सेवा ज्यांसि घडे । त्यासि मीं उरैल हें न घडे ।
फिटे गर्भवासाचें कूवाडें । निवृत्तिराया ॥ ७८ ॥
जेथ स्वर्गसुख बापुडें । वेदांत सुख थोकडें ।
समाधी सुख रोकडें । जेणें लाभे ॥ ७९ ॥
ऐसीया पदार्थें दावीता । जी तुं होसी सर्वथा ।
भवार्णवीं तारिता । तुं चि येकु ॥ ८० ॥
तुं जयातें पाहासी कृपादृष्टि । त्याची सुटे भवार्णवमीठि ।
ज्ञानांचां सेवटीं । संपूर्ण करिसि ॥ ८१ ॥
सद्गुरु आणि आपणयांतें । भेदु नाहिं तेथें ।
जीवनी लवणांतें । उरि नाहिं ॥ ८२ ॥
जयजय परमध्यामपरायेणां । जय दुरिततापहरणां ।
आह्मां हे चि उचित जें चरणां- । बरि माथा ठेविजे ॥८३॥
गुरु आणि गोप्यवस्तु । हें येक चि निश्चितु ।
ह्मणौनि गुरुचरण ध्यातां मोक्षु । असे ॥ ८४ ॥
तवं ह्मणती ज्ञानमूर्ति । तुवां स्तवीला गणेशु आणि सरस्वती ।
त्यां तु चि बोलीलें जें बोलती । वशिष्ठरुषि ॥ ८५ ॥
तंव गुरु ह्मणती नवलाउ । जेयां हृदयी गितार्थाचा अभिप्राउ
तो बोले हा नवलाउ । नव्हे काइ ॥ ८६ ॥
तरि स्वामी साईखडीयाचें बाहूलें । तें तांडवनृत्य नाचों लागलें ।
तें सूत्रधारें नाचाविलें । तेसा जीं मी ॥ ८७ ॥

---

१ संकट. २ परमधामपरायण.

तुमचेया कृपादृष्टि । योगवासिष्ठाची मऱ्हाटि ।
अनुवादैन गोमटि । जरि अनुज्ञा द्याल ॥ ८८ ॥
शब्दब्रह्म ऐसी जे मातु । गुरुसिक्षासी येकांतु ।
तें प्रकट करावेया हेतु । सांघों आतां ॥ ८९ ॥
विप्रां नाहिं वेदाध्ययन । पूर्ण नाहिं शास्त्रज्ञान ।
आर्थितां थोर गहन । वासिष्ट हें ॥ ९० ॥
श्रीगुरु आणि संतांची कृपा । होये तरि तेथिचा अर्थु सोहपा ।
अनुभवेंविण वित्पनाचा बापा । न बोलवे ॥ ९१ ॥
अगम्य अलक्ष्य अगोचर । ईन्द्रियांसी पीडण थोर ।
अभ्यासीं हि कष्टांतर । जवं मना न ये ॥ ९२ ॥
जैसा निंबु जिव्हे कडुवट्ट । हिरडा प्रथमीं तुरट्ट ।
तैसा अध्यात्मा ऐल सेवट्ट । षणुआळां[1] ॥ ९३ ॥
कां गाई दुवाडसिंग । सेवतियेसी दुवाड आंग ।
भोजनसुख माहाग । रांधितेवेळे ॥ ९४ ॥
आतां जाली निवृत्तिनाथकृपा ।
मज मऱ्हाटि बोलतां येथिचा अर्थु सोपा ।
आगळें बोलों तरि साक्षेपा । अनुभवी तुह्मी ॥ ९५ ॥
पडों नेंदिं उणें आगळें । न बोलें संस्कृता वेगळें ।
आपुलिया मती बोलें । तरि श्रीगुरु लाजविला ॥ ९६ ॥
तवं गुरु ह्मणती काई जालें । हें समस्त आह्मां पातलें ।
आतां सांग वसिष्ठासी पूसिलें । रामचंद्रें[2] ॥ ९७ ॥
तरि स्वामी आमचां वंशीं । धाकुटा तवं विद्या अभ्यासी ।
तारुण्य पातलेयां विषयांसी । भोगु करणें ॥ ९८ ॥

---

१ कठीण. पहा:—निंबु जिव्हे कडुवट्ट । हिरडा पाहिले तूरट्ट । तैसा कर्मा-सेवट्ट । खणुवाला होए ॥ श्री ज्ञा. १८×१८४. २ पहा:—तवं गुरु ह्मणति काई जालें । हें समस्त ही आह्मां पातलें । परि आतां सांघे जें बोलिलें । नारायणें ॥ श्री ज्ञा. ९×३२.

वार्धिक्ये मुनिना वृति । योगज्ञानें तनु त्यजिती ।
ऐसी परंपरा वंशीं मती । हें राउळासीं[2] ज्ञान ॥ ९९ ॥
तरि अकरां सहस्रां वरुता । राज्यअभिळाषू वाढविता ।
पुढां कोणु जाणे कैसी वेवस्ता । गुरुराया ॥ १०० ॥
चाळिलें पितेयाचें वचन । मज येकपत्नी नियमन ।
सेउं गेला वन । तेथें स्त्रीवियोगु ॥ १ ॥
पौलस्तीचा रावणु । जो महादेवाचा मुक्षगेणु[3] ।
देव बांदौडीं घालुनु । राज्य करी ॥ २ ॥
जो जाहाला वैरी । तेथें गेलों चरणवरि[5] ।
कव्हंणी येकी शक्ति अविर्भवातें मारी । रावणांते ॥ ३ ॥
ऐसें आझुनियां अंतुवरी । कष्ट चि देखिले अवधारीं ।
न कळे चि कवणां कर्माची थोरी । गुरुराया ॥ ४ ॥
ऋषि ह्मणती विधातेया निष्ठुरा । येवढे कष्ट या अवतारा ।
आणि ज्ञानांचा हि संसारा । कवणें गुणें ॥ ५ ॥
हा नराकृती परब्रह्म । परतत्वाचें निजद्धाम ।
देवांसी अगम्य । माहिमान याचें ॥ ६ ॥
रामु ह्मणे लोकु ह्मणताती अवतारु ।
मीं ह्मणे दशरथरायाचा कुमरु ।
सांपें[6] राज्याचा भारु । ऐसा वाहे ॥ ७ ॥
बंधू पुत्र कळत्र समस्त । धन संपति लक्ष्मी गजांत ।
सांडूनि पळाले वनांत । ते चि धन्य ॥ ८ ॥
सांडौनि योगामृत । जे जाहाले विषइं रत ।
ते आधोगती आर्त । विषयसूकर ॥ ९ ॥

---

१ मुनींच्या वृत्तीनें. ' वृत्ति ' ही तृतिया, मुनिना ही संस्कृतांतील तृतिया. विशेष्यविशेषण या दोहोंची हि तृतिया. २ राउळ=देव. ३ मुख्य. सिष्याचें सिक्ष-तसें, मुख्य यांत ' ख्य '=' ष्य ' आणि ष्य=क्ष्य, क्ष. ४ बंदिवास. ५ वेरी असें श्री ज्ञा. रूप आहे=चरणचालीनें. ६ सांप्रत, आतां. पहा:– तो आइकिजे बहुतां कालांचा । आणि तूं तवं कृष्णा सांपेचा ॥ श्री ज्ञा. ४×३७.

तवं वसिष्ठ ह्मणे आर्तु । कैसा वंशु पवित्रु ।
हा उपदेशिलेयां मूर्तु । ब्रह्म चि होईल ॥ ११० ॥
हा होईल योगियां योगी । हा नव्हे स्मशानवैरागी ।
देखो वेखी योगी । तो हा नोहे ॥ ११ ॥
जाणितला भावभरितु । येक बोलती परि नांहिं हृदयीं हेतु ।
येक सिकवीति लोकांतु । महिमे लागि ॥ १२ ॥
येका संपति ना संतति । तें तोंडें वैराग्य बोलती ।
येक माते पितेया स्त्रियेसी ह्मणती । योगी होउनु ॥ १३ ॥
येक दग्धले व्यापारें । येकांचीं कुटुंबें थोरें ।
व्ययसायें पोट न भरे । ते योगी येक ॥ १४ ॥
तैसा रामु नोहे भोगी । राज्य स्त्री संपति असौनु योगी ।
गुरुमुखें परिसौनि वैरागी । तो दुर्लभु ॥ १५ ॥
जेयाचां मानसीं । हे पूसापूंसी अहिर्णेसी ।
सदा संगति संतांसी । तो चि पावे ॥ १६ ॥
ते देखती सर्व ठाईं सुटला । माया मोहो तुटला ।
तो आपणेयां वेगळा । हों नेदिति ॥ १७ ॥
येथूनि गुरुशिष्यसंवादु । सांगे वासिष्ट पुसे रामचंद्रु ।
ते ये गोष्टीचा अनुवादु । करील ज्ञानदेउ ॥ १८ ॥
रामु पुसे श्रीगुरुतें । कवणीं लक्षणीं वोळखावें संतातें ।
गुरुनें कवण्या सिक्षातें । उपदेशावें ॥ १९ ॥
तवं गुरूते शिष्यु ह्मणे । कवणें संगें संसारु तरणें ।
न इछितां प्राप्ति पावणें । तें आधीं सांगा ॥ २० ॥
तवं वसिष्ठ ह्मणती आईक । हे शत श्लोक सार्ये अधीक ।
संतां आणि ऋषींचा आईक । महिमां तुं ॥ २१ ॥
संतांचिया संगती । अध्यात्मीं होये निर्मळा मती ।
आत्मज्ञानस्थिति । बैसे हृदयीं ॥ २२ ॥

---

१ विचारणा, चालना.

प्रथम साधन येथें । सांडूं नको संतसंगातें ।
तरी पावसी आत्मज्ञानातें । निर्धारेंसी ॥ २३ ॥
सत्संग पुण्यगति । निश्चिता होईजे योगप्राप्ति ।
ह्मणौनि संसारपतितीं । हे चि कीजे ॥ २४ ॥
सत्संगु केलेया नंतरें । मायाजाळ निरशे निर्धारें ।
तेथ शुद्धमती अंकुरें । प्रज्ञात्मक ॥ २५ ॥
ह्मणौनि त्याकारणें । सत्संगु चि करणें ।
मोक्षाची चाड तेणें । सात्विकें पैं ॥ २६ ॥
सत्संगाचें फळ ज्ञान । ज्ञानाचें फळ अनुग्रहो जाण ।
अनुग्रहाचें फळ शांति निर्वाण । शांतीचें फळ आत्मसुख॥२७
नित्यानित्य उमलैल । तो आग्रहो कां करील ।
अनाग्रहाचां पोटीं उपजैल । शांति सहज ॥ २८ ॥
शांति जेथ प्रवर्ते । तेथ आत्मसुख चि वर्ते ।
संसारसुख निवर्ते । आपण चि ॥ २९ ॥
असंतसंग पंकें । देहे मळिनें अनेकें ।
ते मळ क्षाळति उदकें । संतसंगाचेनि ॥ १३० ॥
ह्मणौनु रामा आईक । तुं चिंतुं नको अनेक ।
संतसंगाचें सुख । दृढ धरी ॥ ३१ ॥
आतां तुवां आइकिली संतसंगप्रशंसा ।
परि सांगेन कोणु संतु कैसा ।
ब्रह्मरुषि राजऋषि मुनिशा । आत्मबोधी ॥ ३२ ॥
तरि चतुराननाचा नातु । जो मरिचीचा सुतु ।
कश्यपु विख्यातु । आत्मज्ञानी ॥ ३३ ॥
आणिकु तपक्रियापवित्री । आचारधर्म श्रोत्री ।
तो कश्यपाजवळी अत्री । अध्यात्मवेत्ता ॥ ३४ ॥
सकळ कळा कळाविदु । ब्रह्मण्य पुउषाचा[1] सुतु ।
त्या भरद्वाजासी बोधु । आत्मज्ञानी ॥ ३५ ॥

१ ब्रह्माचा पुत्र जो पूषन् त्याचा मुलगा.

द्वादशा आदित्याचेनि रूपें । जयाची शाठि तपें[1] ।
जयाचया तपें सामर्थ्यें कांपे । चतुराननु ॥ ३६ ॥
जो निर्मळु तपाचारें पवित्रु । कीर्ति साभिमानियां विचित्रु ।
तो बैसला विश्वामित्रु । आत्मध्यानीं ॥ ३७ ॥
जेणें हरिश्चंद्राचा पाहिला सत्वधीरु । जो सूर्यवंशीचा गुरु ।
त्रिशंकु राया लागि निर्धारु । दुजा स्वर्गु रचिला ॥ ३८ ॥
जो निर्मळु तपश्रेष्ठी । ब्रह्मपुत्रा समान परमेष्ठी ।
रचिली दुजी सृष्टी । तो विश्वामित्रु आत्मध्यानी ॥ ३९ ॥
आणिकु रुषिमध्यें उत्तमु । जो बोलिजे गौतमु ।
नररूपें अध्यात्म । अवतारु जो ॥ १४० ॥
जेणें आराधुनीया त्रिपुरांतका । गंगा आणिली मृत्यलोका ।
तारावया अनेका । दुष्कृतांतें ॥ ४१ ॥
ब्रह्म क्षत्री आदि गुरु । जो जमदग्नि रुषेश्वरु ।
तपें जो थोरु । अध्यात्मवेत्ता ॥ ४२ ॥
सूर्यवंशीं गुरु श्रेष्ठ । शांतीचा निघोट[2] ।
सप्तरुषीं माझि वरिष्ठ । तो हा मी ॥ ४३ ॥
जेणें प्रवृत्ति जिंतेली । जो तपाचारें वळी ।
तो बैसला शाकल्यु तेव्हळिं । आत्मध्यानी ॥ ४४ ॥
तेयाचे नवजेण पुत्र । चौघे जाले आचारवंत ।
पांच योगीये विचित्र । अध्यात्मीं ॥ ४५ ॥
जो गर्वु नेघे स्वमेव । समताद्रुष्टी सर्व जीव ।
तो पहिला पुत्र ध्रुव । अढळपदीं ॥ ४६ ॥
दुसरा पुत्रु शशी । उगवला आत्मज्ञानेसीं ।
तो बैसला उपवासीं । चिद्रूपू ॥ ४७ ॥
तिसरा पुत्रु बुधु । आचार विचारें कळाविधु ।
ज्यासी उभयसुखवेधु[3] । आत्मबोधी ॥ ४८ ॥

---

१ "एकाची शाटि तपिन्नली" । श्री ज्ञानेश्वरी. २ सघन अथवा परिपूर्ण.
३ आचारसुख व विचारसुख.

चौथा पुत्रु तारु । पांचवां जोतिष्मा कुमरु ।
यांसी ऐसा निर्धारु । आत्मज्ञानी ॥ ४९ ॥
सतंत योग युग्तीसी । आत्मज्ञान अहिर्निसी ।
तो रुषीश्वरु मानसीं । तत्ववेत्ता ॥ १५० ॥
तयाचा शिक्ष चतुरु । जो अंगिरा रुषेश्वरु ।
योगपदीचा धीरु । होउनी ठेला ॥ ५१ ॥
रुषि येकु वेदद्युति । तेथ प्रतिष्ठिली शांति ।
आसनीं दृढमति । अध्यात्मीं दुजा नाहिं ॥ ५२ ॥
यम नियम अष्टांगयोगु । सूर्यें कथिला चांगु ।
तो योगेश्वरु निशंगु[1] । याज्ञवल्क्यु ॥ ५३ ॥
तपे सुलक्षु सुश्रोतु । ज्ञान ध्यान प्रतिष्ठावंतु ।
तो कौंडन्यु विक्षांतु । योगमार्गीं ॥ ५४ ॥
अतीतें[2] अनागत[3] वर्तमान । जयासी त्रिविध ज्ञान ।
उपदेशु ध्यान । उग्रतप ॥ ५५ ॥
जो अनागत भाकीं प्राश्निकु[4] । शतकोंटि रामायेणी वाल्मिकु ।
तो रुषेश्वरु विवेकु । योगभ्यासी ॥ ५६ ॥
रुषि येकु सनकु । जयाचा चतुराननु जनकु ।
नित्य समर्पणें[5] विवेकु । अध्यात्मवेत्ता ॥ ५७ ॥
दुसरा सनक सनंदनु । ब्रह्मयाचा नंदनु ।
तपाचारें गहनु । आत्मज्ञानी ॥ ५८ ॥
तिसरा ब्रह्मयाचा कुमरु । नारंदु महामुनीश्वरु ।
जितेंद्रिय सकुमारु । योगाभ्यासी ॥ ५९ ॥
चोविसावां अवतारु उदासु । जो बोलिजे वेदव्यासु ।
जो रुषिमाझि प्रकाशु । आत्मज्ञानी ॥ १६० ॥
जो असुरां दैत्यांसी गुरु । बुद्धिविद्येचा सागरु ।
सुरु[6] रुषेश्वरु । अध्यात्मी ॥ ६१ ॥

---

१ निःसंगु. २ भूत. ३ भविष्य. ४ प्राश्नीकु–ज्योतिषी. ५ आत्मनिवेदन. ६ शुक्र.

ज्याचि बुद्धि समस्वि । सुर ईंद्र भोगिती ।
तो देवगुरु बृहस्पति । आत्मज्ञानी ॥ ६२ ॥
व्रासनलीळाचिये भाळीं । अनळु षडतरु कलोळीं ।
तैसा तपें रुषेश्वरु जाबाली । अध्यात्मबळें ॥ ६३ ॥
निरसुनी संसारश्रमु । स्थिर केला ईंद्रियग्रामु ।
छेदिला मोहद्रमु । तो जन्हु रुषीश्वरु ॥ ६४ ॥
कामक्रोधाचेंनि विटाळें । मन जयाचें न मैळे ।
तो कुष्यु रुषेश्वरु भोगी सोहळे । योगज्ञानें ॥ ६५ ॥
भवकर्मविरहितु । भूतभव्य रहितु ।
तो भार्गउ विक्ष्यांतु । योगज्ञानी ॥ ६६ ॥
सचिदानंदसुखी । नांदताये योगविशेषीं ।
निश्चळु दधीशं रुषि । आत्मज्ञानी ॥ ६७ ॥
जयालागि गर्भवासवेथा । विष्णूनें साहिलीया सर्वथा ।
तो अंबरुषि विहितपंथा । योगाचिया ॥ ६८ ॥
जिणौनि माया जगीं । शुकेंद्रु गर्भयोगी ।
व्यासनंदनु जगीं । योगियां वरिष्ठु ॥ ६९ ॥
वेद्व्यासां सिक्षु । आत्मबोधीं दक्षु ।
संजयो विवेकचक्षु । त्रिकाळज्ञानी ॥ १७० ॥
जेणें व्यासकृपा सोहोज्वळ केले ।
जेणें गोप्य श्रुति अर्थ दाविले ।
तो पाणिन्यु रुषेश्वरु खेळे । अध्यात्मपंथें ॥ ७१ ॥
उत्तर पूर्व मीमांसा । प्रवृत्ति निवृति आदि अर्थु ऐसा ।
लोकीं स्थापिला परियसा । जयमुनी ॥ ७२ ॥
आश्रउनी पूर्वसागरु । जेणें स्थापिला लघु गुरु ।
छंदशास्त्री चतुरु । पिंगळरुषि ॥ ७३ ॥

---

१ या पदाचा अर्थ बरोबर लागत नाहीं. कदाचित् 'वरासनलीळा' असें असल्यास लीलेचें वरासन च जणूं असें ज्याचें भाल तो शंकर. २ दधीचि. ३ गर्भांत च जो योगी होता तो. ४ जैमिनी.

भारद्वाजाचा द्रोणाचार्यो । तपें प्रतापें सूर्यु ।
ज्ञानयेज्ञ कारण कार्यु । तो चि जाणे ॥ ७४ ॥
यजुर्वेद प्रतिपादी[1] । सकळ क्रियासाक्ष आदि ।
तो गार्गयो योगबोधीं । संतुष्टला ॥ ७५ ॥
जो न भिये काळा कामां । तो विपृ अश्वस्छामा ।
जो जाणे परमधामा । द्रोणसुतु ॥ ७६ ॥
उतरतां गंगा महापूरु । नव्हे चि विषयभ्रमु स्छिरु ।
तो माहामुनी पाराशरु । अध्यात्मवेत्ता ॥ ७७ ॥
नव्हे मनोभावीं विभक्ता । भवार्णव क्रियामुक्ता ।
तो मुनीश्वरु शक्ता । तपाचारें ॥ ७८ ॥
त्यजूनि भार्या स्वरूपा । अरण्यगिरिचां रिगौनि गुंफा ।
पौलस्ती गेला तपा । तें परिस रामा ॥ ७९ ॥
ब्रह्मयाचा पुत्रु गरुवा । जया नांव विश्वश्रवा ।
अध्यात्मलक्षण भावा । भाव्यु जो ॥ १८० ॥
बरवें परमेश्वरीं भजन । येम नियम आसन ध्यान ।
अरण्यीं राहिले व्यासनंदन । योगालागी ॥ ८१ ॥
तोडूनि आशेचिया शांकळा । उपडूनि अविद्यालोहांचा खिळा ।
अल्पवनु रुषि भोगी सोहळा । योगाचा पैं ॥ ८२ ॥
पंचमां यज्ञहोत्र क्रिया । अव्हान अग्न्यादिश्रिया[2] ।
नैन्हौक रुषीसि प्रिया । अध्यात्मीं ॥ ८३ ॥
नैष्कर्म्य योग उपदेशु । षष्ट्मध्याय[3] भव निरासु ।
तो मनु रुषेश्वरु रूपें परेशु । स्वयंभावें ॥ ८४ ॥
रविबिंब कोटिप्रभा । किं अद्भुत ज्योती अक्षोभा ।
तैसी आत्मचिंतनीं शोभा । योगियांसी ॥ ८५ ॥
स्नानसंध्या संस्छितु । होम तर्पण सहितु ।
बैसला ध्यानस्तु । निळावर्त रुषि ॥ ८६ ॥

---

१ प्रतिपादी=विवरण करणारा. २ अग्न्यादि श्रिया. ३ मानव धर्मशास्त्रांतील भृगुसंहितेचे ६ वे अध्यायांत वानप्रस्थाचा उल्लेख आहे.

जेणें कोण्ही येक अवस्वरीं । इंद्रसंपत्ति सागरीं ।
श्रापूनि घातली सर्वपरी । निमिष्या आंतु ॥ ८७ ॥
साटी खांडियांचें बोने[1] स्वीकारी । ह्मणे मीं निराहारी ।
तो[2] दुर्वासा अभ्यंतरीं । योगु भोगी ॥ ८८ ॥
करितां येकादशी व्रत । अंबरुषीचें सत्वचित्त ।
श्रापूनि दश अवतार भोगवित । विष्णू करवि ॥ ८९ ॥
दुर्वासाचें सोकासन[3] । श्रीकृष्णु वाहे आपण ।
तो निजरूप ध्यान । करी ह्मणौनि ॥ १९० ॥
तेया दुर्वासयापासि । श्रीवस्छ बैसले परियेसी ।
ध्याये ध्यान मानसीं । परवस्तूचें ॥ ९१ ॥
जेणें रविबिंबमंडळीं । मूर्ति दाविली सोज्वळी ।
परिक्षा दिधली अगा जवळी । विज्ञानेश्वरें ॥ ९२ ॥
सप्त पुत्रां सहितु । युधिष्ठिरु तपोवनां आंतु ।
मळमाणि दैत्यें निभ्रांतु । पराभविला ॥ ९३ ॥
तो योगिया देखौनि स्वभावें । शंकर काढावेयासी धांवे ।
तो मल्लमणि वधावें । बहिरवरूपें ॥ ९४ ॥
सांडूनि ग्रह स्त्री संपत्ति । गंधमादन पर्वतीं ।
गूहकु रुषेश्वरू निश्चिति । आत्मज्ञानीं ॥ ९५ ॥
नावें गिरिशु । तपें उतकर्षु ।
स्वामी कार्तिकासरि महेशु । सदा मानी ॥ ९६ ॥
ऋषि क्रौंचु । जेणें निराशिला डंबु प्रपंचु ।
क्रौंच द्वीपीं निःप्रपंचु । सदा योगी ॥ ९७ ॥
करितां देहशोषणें कंपे । गर्व नेघे चि निजरूपें ।
तपसामर्थ्यप्रतापें । सोमदंतासी ॥ ९८ ॥

---

१ नैवेद्य. २ मागें मात्रा देण्याची पुरातन पद्धत अद्याप लेखकानें कायम ठेविली होतीसें दिसतें. येथें मात्रा मागें आहे. आणखी हि बरे च ठिकाणीं असें लेखन आहे. ३ सुखासन, पालखी. ४ येथपासून ओवी २१५ पावेतों मूळ ग्रंथांतील एक पान अनुपलब्ध असल्यानें दुसऱ्या प्रतीवरून ह्या ओवी घेतल्या आहेत. भाषेवरून ही अर्वाचीन कालीं लिहिलेली आहे हें उघड होत आहे च.

जेयाचेनि श्रापाचेनि अनिळें । सगररायाचे महावृंद जळे ।
तो कपिलु महामुनि हृदयकमळीं । भोगी परवस्तु ॥ ९९ ॥
उपमे कळंकी चंद्रु । गंभीरते उणा समुद्रु ।
तो कुक्ष शैलेंद्रु । तपाचार्यो ॥ २०० ॥
पातला सायोज्यसेवटु । तिहीं घटिकाचा लोटु ।
ध्याला परम वस्तु । हृदयकमळीं ॥ १ ॥
तेयासि नेयावेया निभ्रांत । आले मृत्यकाळीं कृतांत ।
ते वधिले येमदूत । षडाननें ॥ २ ॥
तो राउ शांत विवेकी । जाला चिरायु सुखी ।
नांव तेया श्वेतकांक्षि । योगज्ञानी ॥ ३ ॥
दधि साकांक्षीचा पुत्रु । पिप्पलाक्ष नामे पवित्र ।
+[1] + + । + + + ॥४॥
बैसोनि मंदाकिनीचां तटीं । दिग्गजांचेयां पृष्ठीं ।
राक्षसां त्रासिले सृष्टि । मांडव्यरुषि ॥ ५ ॥
प्रज्ञेचेया प्रतीति । परवस्तूचिया स्तुति ।
तो महिम्नरुषि मति । नेणों आगळा ॥ ६ ॥
रुषि एकु मदनमुनि । भीमक रायाचा प्रधान होनि ।
तिघे पुत्र एक नंदिनि । कन्या दिन्हली ॥ ७ ॥
पडिलिया सांनिध्य पाश । जाहला हरणीचा गर्भवास ।
म्हणौनि द्वितीय अवतारीं उदास । मौन्य घेतलें ॥ ८ ॥
ऐसा तापत्रयशांतु । शमदम तप युक्तु ।
तो रुषीश्वरु जडभरतु । सर्वज्ञ राजा ॥ ९ ॥
अवर चातूर्यसार । गणित गुणज्ञ अपार ।
करिते जाले श्रीधर । श्रीरुषेश्वर ॥ २१० ॥
पाहातां क्षितितळीचे महंत । गणगंधर्व समस्त ।
परगंभिर्यता अध्यात्मिक संत । श्रेष्ठादिक ॥ ११ ॥

---

१ येथें दोन चरणें नाहींत.

सत्यसिंधूचिये उदरीं । शांतिरत्नाची वोविरी ।
माझि दीपकाळिका साजिरी । रुषिरत्नांची ॥ १२ ॥
तो विवेकभ्रमराचा रसु । ज्ञानरत्नाचा पुंजु ।
तो रुषीश्वर सपिंजु । महा ज्ञानी ॥ १३ ॥
जो मनिप्रेम ईश्वरभक्तु । आत्मधर्मी असक्तु ।
तो ऋषीश्वरु भक्तु । ज्ञानसिंधु ॥ १४ ॥
मोडौनि गर्भाचार गहनु । स्थिर केलें मनउन्मनु ।
तो रुषीश्वरु नंदवर्धनु । विवेकवृक्षु ॥ १५ ॥
भवोद्भव उत्पांतु । निरसौनि कंदर्प भ्रांतु ।
लीनु तपोवनीं करसांतु । आत्मज्ञानी ॥ १६ ॥
तत्वाची संनिधी । आगळी धर्मादि बुद्धि ।
सुलज्ञ रुषि उपाधी । वेष्टेचिना ॥ १७ ॥
येकदंडी परमहंसु । जाणे पवनाचा डंसु ।
करी उत्तमु पवनाभ्यासु । भरत रुषि ॥ १८ ॥
आचारेनि मार्गें । कर्मरुतु पुढां रिगे ।
तो छेदूनु घातला मार्गें । निर्मळ रुषि ॥ १९ ॥
रुषि येक सुखानंदु । तप पौरुषाचा ईंद्रु ।
ना तो योगविद्यापद्मिनिकंदु । निर्धारेसिं ॥ २२० ॥
विकल्पाचेंनि विटाळें । मन जयाचें न मैळें ।
तो विमळ रुषि ज्ञानबळें । सदा सुखी ॥ २१ ॥
तया विमळ रुषीचिये संनिधानीं । राहिला द्रुमतनयो मुनि ।
फळें पत्रें सेउनी । योगु साधी ॥ २२ ॥
त्या द्रुमतनयाचा गुरू । होये उर्ध्वपट्ट निर्धारु ।
अविल रुषेश्वरू । ज्ञानदृष्टी ॥ २३ ॥
ब्राह्मणु अग्निकेशु । जो रुषिमध्ये उदासु ।
तयाचें तप देखौनु महेशु । शंका मानी ॥ २४ ॥

रुषीश्वरु वदंतु । आचारपद विश्रांतु ।
ब्राह्मणु ब्रुदशसुतु । मांडव्याचा ॥ २५ ॥
रुषीश्वरु सदर्थु । कृष्णद्वैपायनु समर्थु ।
तेणें पाहुनी चतुर्वेदार्थु । महाभारत केलें ॥ २६ ॥
तें महाभारत श्रवणमात्रें। फिटलीं ब्रह्महत्यादि पापें विचित्रें।
जन्मेजयाचीं अपवित्रें । पापें गेलीं ॥ २७ ॥
रुषि येक वामदेॐ । जेणें महरुषी चक्रवर्ती राॐ ।
तो ईंद्रपदीं बैसत खेॐ । शापियला ॥ २८ ॥
इंद्रायणीचेनि अभिळाषें । ऋषि सिणविले नौषें ।
तो मृत्यमंडलीं पंचाशत व[1]रुसे । सर्पु जाला ॥ २९ ॥
नहुष सर्परूपें देखिला । युधिष्ठिरें राये भला ।
शापासी उश्शापु केला । कृपा करुनी ॥ २३० ॥
अगस्तीमुनेश्वरें येकें चुळें । सप्तसागरांचीं जळें ।
सोखूं आदरिलीं निर्मळें । योगबळें ॥ ३१ ॥
वातापि आतापि दोन्हीं । राक्षस हिंसक जाणौनी ।
उभय दैत्य शापुनी । भस्म केले ॥ ३२ ॥
जेणें आत्मज्ञानांचेनि बळें । मंत्र सामर्थ्यांचेनि मेळें ।
जन्मेजयो होमी नागकुळें । तो होमु विध्वंसिला ॥ ३३ ॥
ऐसा तो ब्राह्मण अस्तिकु । अध्यात्मविवेकदीपकु ।
जेणें नवकुळ नागलोकु । राखियला ॥ ३४ ॥
तो अत्रि जयाचा पुत्रु । अग्निनास्ति होये विचित्रु ।
तो अग्निरूप धरूनि पवित्रु । होमु करवी ॥ ३५ ॥
तो शतवरुषे वरि । समुद्राचिये उदरीं ।
जातां मनीं क्षोभु न धरि । भवार्णवाचा ॥ ३६ ॥
ब्राह्मणु अक्षवक्रु । जेणें महिमांनिला शुक्रु ।
आत्मज्ञानें येकचक्रु । होऊनि ठेला ॥ ३७ ॥

---

१ वरुषें, वर्षें.

रुषि ह्मणिजे हिरागरु । पुण्यपियुषाचा सागरु ।
ब्राह्मणु सर्वेश्वरु । आत्मज्ञानी ॥ ३८ ॥
खीर दे ह्मणितलयां साठीं । करूनि खीरसागराची वाटी ।
उपमन्यु पुढां धुर्जेठी । ठेविली पैं ॥ ३९ ॥
त्या उपमन्यूची प्राये धाकुटी । त्यांसी[1] आत्मज्ञान पोटीं ।
जाणोनु धुर्जेठी । सन्मानु केला ॥ १४० ॥
रुषिश्वरु उदालकु । जो ब्रह्मविद्ये चालकु ।
रुषीश्वरु नौतिलकु । समदर्शया ॥ ४१ ॥
जेणें पौलिमा रायाची कामिनी । तियेचे कुंडलें तक्षक जाणौनि ।
आणिले तपा लागौनि । दिधले दक्षिणेसी ॥ ४२ ॥
पुसुनि अविद्येचा लेंखु । काढिला ब्रह्मविद्येचा मोसु[2] ।
तो ब्राह्मणु आध्यात्मवेषु । रुषिमाजि ॥ ४३ ॥
पुण्यदाता उदारु । ब्राह्मणु सनजात कुमरु ।
दुजा सन्मानु मुनीश्वरु । गर्वरहितु ॥ ४४ ॥
रुषी येकु सुखराजु भला । जो तपपियुषीं विरमला ।
मग ब्रह्मविद्ये केला । प्रवेशु जेणें ॥ ४५ ॥
संध्यायनु रुषीश्वरु । जो चतुर्दश भुवनीचा गुरु ।
जो श्रीकृष्णनाथ चतुरु । सिक्षु होये ॥ ४६ ॥
रुषि अलिमल्य शल्यु । रुषि मुद्राबद्धु पिप्पलु ।
ब्राह्मणु शतदर्शके शल्यु । रुषि समाप्य हो ॥ ४७ ॥
रुषि येकु श्रीवछु कैसा । जो क्षितीचा कुवांसा[3] ।
देवांचा कैवारी जैसा । कृतांत वरि कोपे ॥ ४८ ॥
जेणें पयोदधीचे दारवठे उघडिले । अनवसरु ह्मणौनु वारिले ।
ते द्वारपाळ त्रासिले । थोरें कोपें ॥ ४९ ॥

---

१ त्या, त्यासी या रूपांवरून हें पान १४।१५ वे शतकांत लिहिलेलें असावें. या पोथींत दोन तऱ्हेचीं पानें आहेत कांहीं अत्यन्त पुराण दिसतात व कांहीं त्या मानानें जरा अर्वाचीन आहेत. २ मूस? 'रस' असें पाठांतर. ३ आश्रय, साह्य.

सुदर्शन चक्र ठाणांतरीं । होतें तेये अवस्वरीं ।
तें भेण भुमीवरि । खिळिलें ठेलें ॥ २५० ॥
दर्भशिखामात्रें । तेयाचेनि कोपें विचित्रें ।
जयाचेंनि तपसामर्थ्यें पवित्रें । अग्निदग्धें ॥ ५१ ॥
तेजांतरें त्रिमिर देखौनु । सहस्रफणि वासुगी गहनु ।
खटाटोपु जाणौनु । मोआळला ॥ ५२ ॥
लक्ष्मी देवी विश्वरंजी । चरणकमळींकमाजी ।
राजहंसी भीउनु जी । दडकली ते ॥ ५३ ॥
अंनतकल्प शेषशयनीं । योगनिद्रा गहनीं ।
श्री पुराणपूरुषोत्तमु उन्मंनी । पहुडले होते ॥ ५४ ॥
तेणें वक्षस्थळावरी । चरणघातें हाणितला थोरी ।
अध्यात्मवेत्ता जाणौनि श्रीहरी । नमन केलें ॥ ५५ ॥
तैं देवाउरीचें । पद जालें हें साचें ।
अद्यापि श्री वछलांछनाचें । पद पूजिजतसे ॥ ५६ ॥
रुषि येकु वलीका । तपाचारें निका ।
जेणें वरद केली अंबिका । योगागमें ॥ ५७ ॥
जो तपोबळें ब्राम्हणु जाला । जेणे काळु जिंतला ।
महाकाळु त्रासिला । तो मार्कंडेयो ॥ ५८ ॥
रुषि मृकुंडु भला । ज्यासी मार्कंडेया सारिखा पुत्रु जाला ।
जेणें सार्थकु केला । केसरिध्वजु ॥ ५९ ॥
रुषि रोमहर्षणु । अजरामरु प्रवीणु ।
जो आउठ कोडी मार्कंडेयाचा निपुणु । लाधला आयु॥२६०॥
भेण कांपे काळु । श्रापासी भिये विंध्याचळु ।
तो रुषि मदनपाळु । कळानिधि ॥ ६१ ॥
निष्ठा भावगर्भीं । मुक्तिशळाखा सुभीं[1] ।
तो रुषेश्वरु अलोभी । भावभोगिया ॥ ६२ ॥

---

१ 'शोभी' पाठांतर.

जो ब्राह्मणु तपें चांगु । प्राणायाम अभ्यासीं योगु ।
तो मुनेश्वरु रुषि श्रींगु । विभांडकाचा ॥ ६३ ॥
जो दशरथ रायाचां घरीं । होता आलेयावरि ।
श्री त्रैलोक्यनाथु निराकारी । उदरासी आणिले ॥ ६४ ॥
अनंतकल्प तपें । केलिया न पविजे योग खपें ।
तें तूं परब्रह्म रामरूपें । आकारा आलेति ॥ ६५ ॥
ब्राम्हणु विष्णु । जो सकळ धर्मीं प्रविणु ।
तेयाचा प्राण कृष्णु । विमळ प्रळयागीचा ॥ ६६ ॥
जयाचा पडिलेयां श्रापु । हटकेश्वरा हो कंपु ।
तो रुषेश्वरु कूहूकु । पुत्रु चित्रांगदाचा ॥ ६७ ॥
कोपलेयां वृद्ध काश्यपासी । दिगज जाती मुसीं ।
जो आद्यमूळ ब्रम्हविद्येसी । पवनाभ्यासी ॥ ६८ ॥
जो रुषेश्वरु विमनु । जेणें जन्म प्रणउ अभ्यासुनु ।
प्रळयमु दैत्य श्रापुनु । भस्म केला ॥ ६९ ॥
नवकुळ नागांचिये वेली । जेणें उत्पति स्रजिली ।
हे पुराणप्रसिद्ध बोलि । रुषिवचन भार्गउ ॥ २७० ॥
रुषेश्वरु घंट धेनुवा । जो मानला सुरेंद्रदेवां ।
जो आत्मज्ञान मुक्तीचा ठेवा । होऊनि असे ॥ ७१ ॥
रुषेश्वरु विनाचकेचु । जेणें निराशिला प्रपंचु ।
ब्राम्हणु यातावु सुनेचु । रुषि बभ्रु ॥ ७२ ॥
रुषि धेनुचार्या । जो सकळ धर्माचार्या ।
रुखि त्रिदशु सूर्या- । समान तपें ॥ ७३ ॥
रुषेश्वरु प्रत्सादनु । जेणें अधर्मीचा घेतला मानु ।
रुषि असुराननु । विक्ष्यांतु जो ॥ ७४ ॥
रुषि बिल्हणु । जो सकळकळाप्रवीणु ।
प्राणावर्त ब्राम्हणु । शांतीचा पै ॥ ७५ ॥

यैसे अठ्यासी सहस्र रुषी । विचरति सहजसुखी ।
दशरथनृपती राहाविलें अवश्यकीं । योगालागि ॥ ७६ ॥
हे रुषेश्वरांची नामावळी । अशेष सांगितली तुज जवळि ।
आतां तुझ्यां हृदयकमळीं । काइ मानलें ॥ ७७ ॥
ब्रम्हरुषी राजरुषी मुनीश्वर । योगाभ्यासी निपुण थोर ।
यांच्या संगतीं ठाकिजे वस्तु पर । अव्यक्त जे ॥ ७८ ॥
सांगैन सिद्ध साधक अनेक । गोरक्षादि अशेष ।
जिहीं संसारसंगु त्यजूनि निशेष । भस्म केला ॥ ७९ ॥
अनिळ बुध निरंजन । आदि अनादि मीन ।
मछेंद्र चौरंगि गहन । भूचर जती ॥ २८० ॥
गोरक्ष संती तंती अचळी । वीरु वालोई[1] लीळा पांगळी ।
सियाळी[2] कनखळी । शबारिनाथु ॥ ८१ ॥
निर्गुणु जळधो विरुवा । चर्पटि कंकाळी सरुवा ।
भेगुडु चंपकी गरुवा । धुमणीनाथु ॥ ८२ ॥
कडियाळी कंथडी गोळी । जाळांधरि मंकिकु दाळी ।
मेदिनि पंकज चोळी । अनंतसिद्ध ॥ ८३ ॥
ऐसेया अनंत सिद्धांचें साधन । सांघतां नेघैल तुझें मन ।
आझुनीं इंद्रियांसिं दमन । जालें नाहिं ॥ ८४ ॥
तवं रामु ह्मणे असे विनवणिं । हे अमूर्ता[3] योगवाणिं ।
काइ अमूर्त्तांचा आरोगेणीं[4] । पुरे ह्मणवें ॥ ८५ ॥
धन्य आमचा सूर्यवंशु । तुह्मां सारिखे ज्ञान उपदेषु ।
आतां तुटला भवपाशु । निश्चयेंसीं ॥ ८६ ॥
स्तुति स्तौत्य उभयता । करणें न लगे सर्वथा ।
आतां सांगैं रघुनाथा । जीवीचें तुं ॥ ८७ ॥

---

१ या पूर्वी 'इंगळी' हा शब्द समासांत जास्त घातला आहे. २ यापुढें समासांत 'मायाळी' जास्त आहे. ३ अमृता=अमृताची. ४ खाणें येथें पिणें.

आगा जाईजे वैरागेरा[1] । तेथ खणतां लागे हिरा ।
ढाळूनि सकळ शास्त्रां । राहिजे येके लोई[2] ॥ ८८ ॥
येका येकी योगारूढु । जाहालां[3] होईन ह्मणे मूढु ।
पुसतां लागे गोडु । गुरुशिष्य जाणे ॥ ८९ ॥
पुसतां पुसतां । जाणवे शिष्यांचें आर्त ।
गुरु हि तत्वता । सिष्यु जाणे ॥ २९० ॥
सडितां सडितां तांदुळ । बरवे होती उजळ ।
कां धूतां उज्वळ । वस्त्र जैसें ॥ ९१ ॥
तये धूतलिये वस्त्रीं जैसें । रंगु दिजे तो वैसे ।
नां चोखा[4] सुवर्णावरि जैसें । सुजाती माणिक ॥ ९२ ॥
इतुकी वसिष्ठरुषीची बोली । म्यां संस्कृताची मऱ्हाटि केली ।
उधरावेया केवळी । बहुतां लोकां ॥ ९३ ॥
जैसी दीपामाझि दिवटी । कां तिथिमाझि पूर्णिमा गोमटी ।
तैसी भाषांमध्यें मऱ्हाटी । सर्वोत्तम ॥ ९४ ॥
जैसी सरितांमधे गोदावरी । कां पर्वतांमध्यें रत्नागिरि ।
तैसी भाषांमध्यें साजिरि । मऱ्हाटि पैं ॥ ९५ ॥
हरळांमध्यें रत्नकिळा[5] । कां पुष्पामध्यें कमळ ।
तैसी भाषामध्यें सोहज्वळा । शोभिवंत दिसे ॥ ९६ ॥
दुर्गावरि शोभे चरि । कां मुक्ताफळे शोभती हारी ।
तैसी शोभे भाषा माझारि । मऱ्हाटी पैं ॥ ९७ ॥
तीर्थां मध्यें काशी । कां व्रतांमध्यें येकादशी ।
भाषांमध्ये तैसी । मऱ्हाटी शोभिवंत ॥ ९८ ॥
परिमळांमध्यें कस्तुरी । कां अमरांमध्यें शंबरारी ।
तैसी मऱ्हाटी सुंदरि । भाषांमध्यें ॥ ९९ ॥

---

१ खाण. २ लो=लक्ष. लोई=लक्षीं, लयीं. ३ येथें 'कां' जास्त मागाहून घातला आहे. ४ शुद्ध. ५ बारिक खोंडा.

ऐसी मऱ्हाटी सुंदरी । ते संस्कृतां[1] शोधु करी ।
शटिकें[2] बैसवी हृदयमंदिरीं । अज्ञानांचां ॥ ३००
मूर्खहृदयातें बोधी । विविध अर्थातें शोधी ।
अज्ञानासी बोधी । मऱ्हाटि पैं ॥ १ ॥
मूर्खासि चतुरां करी । सोधु दावी सारासारी ।
ज्ञातव्य वाखाणी संसारीं । मऱ्हाटी हे ॥ २ ॥
बहुत संस्कृतीं अनुरागु । सर्वशास्त्रीं विचारु चांगु ।
परि मऱ्हाटिवांचूनि पांगु[3] । कवण फेडी ॥ ३ ॥
मऱ्हाटी बोलतां बरवि । सर्वत्र जाणीव मिरवी ।
दुर्जनां करवीं सांडवी । पाषांड पैं ॥ ४ ॥
ऐसिया मऱ्हाटिया पवित्रा । लेणें करीन अध्यात्मशास्त्रां ।
बहुतां लोकांसीं पवित्रा । करावेयां ॥ ५ ॥
या कारणें कष्टीं । योगु सूनु दृष्टी ।
विनावितसे श्रोतेजनां श्रृष्टी[+] । ज्ञानदेउ ॥ ६ ॥
श्रोते जनां नमस्कारु । तुह्मीं सर्व सुखाचा सागरु ।
तुमचा होये कृपाकरु । तरि ग्रंथासी रूप ॥ ७ ॥
भरला पदार्थीं[4] अनेकां । वक्ता चतुरु जाला निका ।
परि श्रोतेनवीण वक्ता । चतुरु केवि ॥ ८ ॥
तांथुवेविण[5] प्रकारु । केवि होये मुक्तांचा हारु ।
तैसा श्रोतयावीण टीकाकारु । श्लाघ्यु कैंचा ॥ ९ ॥
खिर नीर येकत्र पवाडु[6] । तेथ राजहंसु करि वाडुँ ।
तरि पयजळाचा निवाडु । केवि होये ॥ ३१० ॥
समुद्रीचा पाणिबुडा । काढी विविधें मुक्ताफळें फुडां ।
परि पारखियेंविण सुपाणि खरडां । केवि होये ॥ ११ ॥

१ समासांत 'चा' आहे. २ सटीक; सार्थ (?) ३ पराधीनपणा ४ पद+अर्थ. पदें व त्यांचा अर्थ. ५ तंतु. ६ ठाव, अवकाश. ७ कोंडें; येथें 'कु' जास्त समासांत आहे ह्मणून त्याचा अर्थ 'कुवराई' असा घ्यावा. ८ फुडें=खरें. ९ खरडे मोतीं. + येथें 'सि' जास्त आहे.

स्वामींचे अवसान अवस्वरीं । सेवकु उठे प्राणावरी ।
तेथ स्वामी दुचिता तारि । कवण करी मानु तया[1] ॥ १२ ॥
चरण चालणें होती कीरु । परि तो नेत्रीं असे अधिकारु ।
तैसा वक्ता नोहे चतुरु । श्रोतेनविण ॥ १३ ॥
वन्हि प्रसवौनि खडतरु । सूर्यकांतीं होए निर्धारु ।
परि तो ठेविला अधिकारु । रविमंडळीं ॥ १४ ॥
सोमकांतु द्रवता कीरु होये । परि ते हातवटि चंद्रीं चि आहे ।
तैसा वक्ता चि परि वग्ता नोहे । श्रोतेनविणे[2] ॥ १५ ॥
वैखरी बोलौनि वगत्रीं । परि तो आईकता[3]-अधिकारु श्रोत्रीं ।
तैसा श्रोतेनाविण जगत्रीं । वग्ता केवि मांने ॥ १६ ॥
तुमचियें कृपेवीण । वग्तव्य मानी कवण ।
मिं प्राकृत येक हीण । श्लाध्य किजे ॥ १७ ॥
मनें वाचा कर्मणा । पुढीलांच्या प्रमाणुं समान गुणां ।
मेरु येवढें महिमान । ठेवा तुह्मि ॥ १८ ॥
ऐसें कारुण्य तुमचे चोखडें । जें कल्पतरूचेनि पाडें ।
आर्ति पुरवी ह्मणौनी कोडें[4] । विनवितसें ॥ १९ ॥
तुह्मी अवलोकाल प्रियता । तरि ग्रंथु घेईल मान्यता ।
मज दुर्बळासी ह्मणतील ज्ञाता । योगज्ञानी ॥ २० ॥
तुह्मां श्रोतयां शुभा । अक्षोभ तुमची सभा ।
ह्मणौनि मिं आपशोभा । दावितुसें ॥ २१ ॥
जैसें अगणित तारामंडळ । कीं समुद्रार्णवीचें जळ ।
तैसें तुमचें सभामंडळ । अक्षोभ जी ॥ २२ ॥
नां विष्णुलोकीची श्रुष्टि । अमोघमेघांची वृष्टि ।
कां अमृत चंद्राची दृष्टि । तैसे तुह्मी ॥ २३ ॥

---

१ या ओवींतील 'उठे प्राणावरी' या पदांचा अर्थ जरा चमत्कारिक आहे. 'प्राण देण्यास तयार होतो'. हा त्याचा अर्थ आहे. २ पहा:–सोमकांत द्रवता कीरू होये । परी ते हातवटी चंद्रि चि आहे ॥ श्री ज्ञा. ९×२९. ३ ऐकण्याचा, वस्तुतः ऐकणाराचा. ४ कौतुकानें.

कल्पतरूचें देणें । कां कामधेनूचें दूभणें ।
चिंतामणीचें पुरवणें । तैसे तुह्मीं ॥ २४ ॥
तुह्मां संतांचीसभा । श्रोतेजनांची अक्षोभा ।
जैसा गभीरु मेरुशोभा । न पवे चि जि ॥ २५ ॥
ऐसेयां सर्वज्ञा श्रोतयां प्रति । विनविलें तें परिसाति ।
परि पाखांडियांची संतीं । लेखा नये ॥ २६ ॥
जें कळयोगीचेंनि काळें । कर्तृत्वें पालटिलें सकळें ।
येथ नांदिजे केवळें । अधर्में पैं ॥ २७ ॥
नारी होती परद्वारिणी । निर्जळा बावी पोखरिणी ।
फळ फूल द्रुमांगणीं । आथि चि ना ॥ २८ ॥
दिनेंदीन खिन्न । पातले सर्व सुखांसीन ।
विहित कर्मीं हीन । विश्व सकळ ॥ २९ ॥
तीर्थें भंगती शृष्टि । लोकांसी दोषदृष्टी ।
जागिजे पापिंष्टी । विषयांवरि ॥ ३३० ॥
लोपले आचार । हारपले विचार ।
ब्राह्मणीं सदाचार । सांडिले पै ॥ ३१ ॥
गत क्रिया पवित्रा । भंगली यात्रा ।
पित्या आणि पुत्रा । महा वैर ॥ ३२ ॥
कुकर्मांचेया विनोदा । विश्व रिघे सदा ।
अपार निंदा । साधूंची पैं ॥ ३३ ॥
ऐसी कलयुगीची परी । पाखांडी जाले घरोघरीं ।
जे दुराचारी । पापरूप ॥ ३४ ॥
ऐसेयां दुर्जनां दुष्टां । लावावेया सुष्टा वाटा ।
हा ग्रंथु केला मऱ्हाटा । या चि लागि ॥ ३५ ॥
तवं गुरू ह्मणती पारु । बोलतां ग्रंथु घेतसे पसरु ।
तुं बोलतासि उपकारु । बहुतांचा पैं ॥ ३३६ ॥

इति श्री योगवासिष्ठे । वसिष्ठ रामसंवादे ऋषिसिद्धसंगप्रशंसा नाम प्रथमोध्यायः ॥ ॥ छ ॥ ० ॥

## ॥ अध्याय दुसरा ॥

आतां सावचित्तें अंतष्कर्णें । वसिष्ठासी रामु काइ ह्मणे ।
तें सांघैन बोलणें । ह्मणे ज्ञानदेॅउ ॥ १ ॥
तेथ पुसता राम सूर्यवंशी । सांघताये वसिष्ठ रुषि ।
तेथिची गोडी कैसी । तें अव्यक्तु जाणें ॥ २ ॥
सिक्षासिं गुरुची आर्ति । गुरु सिक्ष्याची प्रीति ।
उभयता भाग्यगती । कैसी पां ॥ ३ ॥
सद्वंशजू सिष्यु । आणि योगज्ञानीं दक्षु ।
गुरूतें तरावया पक्षु । पुसतुसे ॥ ४ ॥
बाप वशिष्ठु भाग्यवंतु । परब्रह्मेंसी येकांतु ।
अवतारु परि भ्रांतु । कारुण्य भाकि ॥ ५ ॥
तुह्मीं योगज्ञानी श्रेष्ठ । आणि रुषिमाजि वरिष्ठ ।
माझे गर्भवास कष्ट । निरसावे ॥ ६ ॥
आतां वसिष्ठ योगियां[1] राणा । रामु भाकितुसे करुणा ।
परमार्थींचिया खुणा । लागौनिया ॥ ७ ॥
तंवं तया चि प्रसंगा माझारि । शिष्यु गुरूतें प्रष्णु करी ।
जि उपदेशावेया संसारीं । योग्य कवणु ॥ ८ ॥
तवं गुरू ह्मणती आपण । पुसतासि शिक्षाचें लक्षण ।
तरि सावध करी अंतष्कर्ण । निर्धारेंसीं ॥ ९ ॥
वोळखिजे मांनसीं । जो देखिजे अळसी ।
सिक्षु न कीजे तयासी । सद्गुरुरायें ॥ १० ॥
जयाचें चंचळ मन । आणि जाणिजे पराधीन ।
विशेष लक्षणीं दुर्जन । तो सिष्यु न कीजे ॥ ११ ॥
आपण नव्हे स्वयंभु । वरि विचारें मुक्तंभु ।
लाभालाभीं नेणे प्रारंभु । तो सिष्यु न कीजे ॥ १२ ॥

---

१ योगियांचा.

सदा कळीं क्रूरु । नाहिं धर्माधर्मी विचारु ।
नोळखे आपपरु । तो शिष्यु नको ॥ १३ ॥
जो देखिजे वेसनीं निपुणुं । अती चांचल्यतनू ।
निर्धारेंसीं अज्ञानु । तो सिक्षु न कीजे ॥ १४ ॥
जो देखिजे कपट्टु । अन्रुतभाषीं शठु ।
[1]संगळुं नष्टु । तो शिष्यु न कीजे ॥ १५ ॥
आर्ति उपजे बरवि । स्वकार्य तत्पर करवी ।
गुरुकार्य जिरवी । प्रळापौनु ॥ १६ ॥
मानसीं कठिन कोप । अनृत बोलणें अमूप ।
अन्नांची बहु लालुध्य । तो शिष्यु नको ॥ १७ ॥
लटाकि च घे भांभ[2] । करी अपार डंभ ।
बुद्धि नांहिं स्वयंभ । तो सिष्य नको ॥ १८ ॥
सदा श्रिंघारि काया । हृदयीं नांदे अनृत्य माया ।
जो देखिजे मंदातिर्या[3] । तो सिक्षु नको ॥ १९ ॥
उर्मीचा ले उत्कर्ष[4] । शून्यहृदय मूर्ख ।
गुरुसी देखे तर्कू । जीवीत्वाचा ॥ २० ॥
वेवादीं नित्य रतु । पाहे द्विजांचा अंतु ।
विश्वासीं करी घातु । तो शिष्यु नको ॥ २१ ॥
प्रज्ञार्थी अल्पु । मिथ्या चि करी जल्पु ।
भेदार्थी विकल्पु । तो शिष्यु नको ॥ २२ ॥
करी जारण मारण स्तंभन । घुट्का[5] उचाटन मोहन ।
धातु यंत्र मंत्र अंजन । ईत्यादि सिद्धी ॥ २३ ॥
सिद्धि साधन अकंक्षा । वैश्यादि कराणि संक्ष्या ।
कूजांत्र कौटल्य परिक्षा । करुनु पाहे ॥ २४ ॥

---

१ परकीयाचे आश्रयास राहणारा? ओसंगळ-छत्र, कृपा. २ शोभा, आभास. ३ अतिमंद. ४ ज्याच्या उर्मी प्रबल आहेत, असा. ५ भक्त जो एक मंत्रित गोलक देतात तो.

निर्धारें अज्ञानु । वरि विशेषें श्रधाहीनु ।
देखिजे संशयात्मकु । नाशरूपु ॥ २५ ॥
परद्रव्य तस्करु । गुरुस्थानीं कातरु ।
परद्वारीं सदा[1] रतु । तो निका नोहे ॥ २६ ॥
सदा अनर्थीं उभा । अमंगळु आणि अशुभा ।
गुरूसीं ये क्षोभा[2] । तो निका नोहे ॥ २७ ॥
अनेगीं नाथिलिया व्रतीं । वेष्टितु उलंबनी समस्तीं ।
अधर्मीं पाहातां क्षितीं । दुजा नांहिं[3] ॥ २८ ॥
उमटू आणि वाजटु[4] । निसत्व निद्रितु अव्हांटु ।
अज्ञानु अपसरु झडु । तो त्यजावा ॥ २९ ॥
दुष्ट दुर्जनु शोषी । आहाचु अधरु असंतोषी ।
शठू संशयात्मकु दोषी । दीर्घ क्रोधी ॥ ३० ॥
उधटु उमेटु[5] असंतष्टु । हटी कपटु कुचिष्टु ।
आक्रियु अविश्वासी मर्कटु । तो शिष्यु नको ॥ ३१ ॥
वंचकु विलंबकु कोपी । विसरु विग्रहो पापी ।
श्रीगुरूतें साक्षेपी[6] । सभे माझि ॥ ३२ ॥
व्याकुळु कुचर्चकु रागी । उर्मि गर्वु आंगी ।
मिथ्या चि कुसंगी । तो निका नोहे ॥ ३३ ॥
हटि हिटा हिंसकु । निर्लज्जु निर्भयो निंदकु ।
चपळु चंचळु चिंतकु । तो सिक्षु नको ॥ ३४ ॥
विसरु व्येवादी व्यसनिकु । विघडु विसरु वर्मिकु ।
कनिष्ट कोपी क्रूरकु । तो वर्जिजे ॥ ३५ ॥

---

१ 'सदा' या पदावरून एखादें वेळचें परद्वारगमन क्षम्य असें नव्हे. तर तें अतिरेक दर्शक नुसतें पद आहे. २ 'अक्षोभा' असें पाठांतर. ३ या ओवीचा अर्थ स्थूलमानानें असा दिसतो. 'अनेक परस्परविरुद्ध व्रतांनीं जो नेहमीं आवृत, ह्मणून अधर्मी'. ४ वाचाळ, वादाड्या. ५ उमाठ-फुगलेला, चढलेला. ६ अधिक्षेपी या अर्थानें हा शब्द असल्यास न कळे.

सदा करि उद्वेगु । अतुट दुर्जनाचा संगु ।
बहुत वैश्यांचा[1] अनुरागु । तो निका नोहे ॥ ३६ ॥
चोरु वाचालिकु चुंबकु । लटिका लंपटु लावकु ।
क्षणयेक षठु चित्तसम्यकु । तो नको ॥ ३७ ॥
मद्यमांस सेवकु जूआरी[1] । वैश्या पापार्धि चोरी ।
परद्वार अहिर्णेसी करी । तो वर्जावा ॥ ३८ ॥
हाट चोहटां उभा ठाये । परस्त्रिया न्याहळून पाहे ।
वृथा घरोघर जाये । तो वर्जावा ॥ ३९ ॥
वापी कूप तटाकीं । विषयचेष्टा करी अनेकी ।
नाहिं नित्याचारीं वोळखी । तो निका नोहे ॥ ४० ॥
बाल रंजक शब्दें खेळवी । परस्त्रियांतें चाळवी ।
विषयार्थे भलेतीसी आळवी । तो सिक्षु न किजे ॥ ४१ ॥
अवळे सवळे रात्रीं । उभा ठाये कळासां सूत्रीं[२] ।
अवसंधीं तिष्ठे अवसुत्रीं । तो दूरी किजे ॥ ४२ ॥
कारुण्य कृपा रहितु । निर्दय दात्य सुकृता नांहिं आर्तु ।
जीववधांचां ठाई घातु । तो परित्यजिजे ॥ ४३ ॥
श्रद्धाहीनु जो देखिजे । निश्चिंतु पापात्मा वोळखिजे ।
नास्तिकांतें कीजे । दूरी देखां ॥ ४४ ॥
भिन्नकु आणि भेदवादी । पाषांडी आणि पापबुद्धि ।
साधुजनांतें निंदी । तो सिक्षु नको ॥ ४५ ॥
स्वधर्मी विमुखु । नाहिं परिणामीं संतोखु ।
सदा करी पापघोषु । तो दूरी कीजे ॥ ४६ ॥
जो देखिजे संशयात्मकु । धूर्तु आणि हेतकु ।
दुराचारी बकवृत्तिकु । तो सिक्षु नको ॥ ४७ ॥
जाउनि संताजवळि बैसे । कांहिं त्यांसी पुसे ।
उत्तर घेऊनि हांसे । जगापुढां ॥ ४८ ॥

१ मागें २६ वी ओवीवरील टीप पहा. येथें 'वैश्या' चे ऐवजीं 'वेश्या' पाहिजे. २ एकप्रकारचा खेळ.

संतांचा उतरीं । संतांसीं वेवादु करी ।
उणिव आणी सर्व प्रकारी । अमंगळु तो ॥ ४९ ॥
संतांची कूटि[1] खाये । सदा अनर्थु वाहे ।
स्वधर्माचा अंतु पाहे । तो सिक्षु न कीजे ॥ ५० ॥
सत्योत्तर नांहिं वाणीं । देहीं अकर्ताची खाणि ।
तो सिक्षु न किजे कव्हणीं । तत्ववेत्ता ५१ ॥
धर्मीं चाड श्रद्धा नांहिं । शठु येकु पांहिं ।
मग परतौनि न पाहे कहिं । तो सिक्षु नोहे ॥ ५२ ॥
सिकों पाहे वेधावंति । परि हृद्यीं नांहिं आर्त्ति ।
करी संतासीं धूर्ति । तो सिक्षु तेजावा ॥ ५३ ॥
अवसरु आणि अभाग्या । लंपटु आणि दुलंग्या ।
क्षेणिकु आणि स्मशानवैराग्या । तो सिक्षु नको ॥ ५४ ॥
निंदकु आणि कर्मभ्रष्टु । तर्कवादी आणि क्षमानष्टु ।
कुतर्कवासनीं कुचेष्टु । तो निका नोहे ॥ ५५ ॥
सदा भाषीं कार्पण्य । देखिजे असंतुष्टपण ।
अनृत्य बोले अगण्य । तो निका नोहे ॥ ५६ ॥
देखिजे शोकाकुळितु । चिंतातुरु वहुतु ।
निश्चळत्व आणि येकांतु । कहि चि नांहिं ॥ ५७ ॥
जो कां आत्महिंसकु । आणि वेवादमार्गु प्रवर्तकु ।
सर्वार्थी अविवेकु । तो सिक्षु नको ॥ ५८ ॥
बुद्धि नाहिं स्वतंतरी । दृढत्व नाहिं शरीरीं ।
वेळोवेळां भांडाई करी । आपण चि ॥ ५९ ॥
कामिकु आणि क्रोधी । लोभिकु आणि मंदबुद्धि ।
मोहिकु आणि अशोधी । तो सिक्षु नको ॥ ६० ॥
हर्षरहितु विषादी । शोकचिंतात्मकु निर्बुद्धि ।
दुर्वाड सदा शोधी । तो सिक्षु न कीजे ॥ ६१ ॥

---

१ आळ. २ ब्रह्मविद्या ? वेद ? ३ कृपणता. येथें ' भाषेंत नेहमीं दैन्य दाखविणारा. '

हटें पुढिलांसी अडवी । वर्मोचारीं लाजवी ।
नव्हे तां अर्थु जडवी । पुढिलाचां आंगीं ॥ ६२ ॥
आपुला चि प्रळापु वाढवी । सवमें वक्तयासी अडवी ।
संसर्गीं दुष्टता वोडवी । तो सिक्षु नको ॥ ६३ ॥
करि अपार हंसु[1] । ज्यासी नासाग्रीं तसु ।
भूलिवां बहुत भ्रमु[2] । तो सिक्षु न कीजे ॥ ६४ ॥
सदा कर्मकांड चि देषे । सदाचारें बहू चि तोषे ।
योगियां कर्मीं घालि विशेषें । तो सिक्षु नोको ॥ ६५ ॥
स्वधर्माथें[3] ह्मणे जड । बहू कर्मक्रियेचें कोड ।
हीणातें[4] करी वाड । तो सिक्षु नको ॥ ६६ ॥
स्वकार्य[5] आधिं घडी । परकार्य वृथा दवडी ।
रात्रिदिवसु पाहे सवडि । निंदा करावया ॥ ६७ ॥
पुढिलासी अपमानु करी । सदा आळवी वर्मोचारीं ।
ना तरि दुर्वचन मारी । सात्विकांथे ॥ ६८ ॥
हृदईं वाहे आकृतें । लटिका चि मित्रत्त्वें वर्त्ते ।
त्याचा विश्वासु धूर्तें । न करावा ॥ ६९ ॥
येरएरां लावालावि करी । ऽखटे बोले घरोघरीं ।
तो सिक्षु नकिजे चतुरीं । तत्वता ॥ ७० ॥
होकया होका मेळवी । दुलंगी दोषांतें वाढवी ।
तो सिक्षु स्वभावीं । ऽषटा चि ॥ ७१ ॥
ऐसा जो मध्यलंडु । वाढवी आपुला चि फंडु ।
दुर्मती कोंडु[6] । तो सिक्षु नको ॥ ७२ ॥
येक चि ज्ञान निरुति । निर्धारें दोघे अभ्यासिती ।
स्थिर होये सुष्टाचिये चितीं । तो सात्सिक्षु पैं ॥ ७३ ॥

---

१ ‘ अहम् ’=अहंकार. २ ज्यास अत्यंत भ्रम अथवा विसराळुपणा असा. ३ ‘ थें ’=तें हा चतुर्थीचा प्रत्यय लक्षांत घेण्यासारखा आहे. ‘ अर्थे ’ याचें अपभ्रंष्ट रूप तर ‘ थें ’ नाहीं ? ४ हलकट. ५ खोटा, वेळेवर नजर देऊन बदलणारा, अविश्वासी. ६ कुडा ?

तें चि ज्ञान । दुर्जेयासी ये परिपूर्ण ।
तो पापिया गुरूसी दुष्टपण । करुं लागे ॥ ७४ ॥
येथ आश्चर्य नांहिं । सुष्ट थोडे चि पाहिं ।
दुष्ट कळिआंतु उणे नाहिं । जाणिजसु ॥ ७५ ॥
मिं बोलतसें श्लोकार्थु । ग्रंथु असे पसरु घेतु ।
जरि बोले संकळितार्थु । तरि ग्रंथु ठाकैल ॥ ७६ ॥
सांगतां नुबगे[1] चि वसिष्ठु । परिसतां न भंगे चि रामु सुभटु ।
मग मज उबगवटु । कां वाटतसे ॥ ७७ ॥
पावौनु येकू चि गुणु । जेवि लवे वंशज धणु ।
तैसा सुष्ट विद्या पावौनु । सिधि पावे ॥ ७८ ॥
आणुनु मंचकगात्रीं । गुणकोडी येकि लाविले सूत्रीं ।
तरि लवणभंजन[2] गात्रीं । येईल काई ॥ ७९ ॥
तैसें सांडावे अवगुण । वसिष्ठ ऋषि बोलिले आपण ।
ते मऱ्हाटि टिका करुनु । सांगतुसे ॥ ८० ॥
जन त्रिविध कुचरु । करिती निंदेचा संसारु ।
याकारणें परिहरु । घेतासि जे ॥ ८१ ॥
श्लोकार्थींचें अक्षेर उणें । बोलौनु मऱ्हाटि बोलणें ।
अथवा आगळीक बोलणें । तऱ्हीं पाप ॥ ८२ ॥
श्रीनिवृत्तिचरणांचिया कृपा । मियां मऱ्हाटि केलीया अमूपा[3] ।
मुळग्रंथु पाहोनु संतोषा कां आक्षेपा । ज्ञानदेउ म्हणे ॥ ८३ ॥

इतिश्री योगवासिष्ठे वसिष्ठरामसंवादे सिक्षदूषणंनाम: द्वितीयोऽध्याय: ॥ २ ॥



---

१ न कंटाळे. २ अत्यादाराची बोलणीं, येथें मऊपणा. ३ येथे पूर्वी 'उपखा' असें पाठांतर होतें. तो शब्द खोडून 'अमूपा' हा शब्द घातला आहे. 'उपखा'=(तृतिया)=मोठ्या श्रमानें. हा च पाठ बरा.

## ॥ अध्याय तिसरा ॥

आतां सांडूनि अध्यात्मगोडी । दुर्जनु दोषांतें जोडी ।
जैसी सुकरासी आवडि । अमेध्याची ॥ १ ॥
सुष्ट जन धर्मु चि आश्रांती[1] । अधर्मु सांडिती ।
ज्ञानामृत सेविती । कर्णपुटीं ॥ २ ॥
जैसें खिरनीर मिश्रित असे । तेथ राजहंसु बैसे ।
तो खिरपान करी निरवसें[2] । तोय तें ठेवी ॥ ३ ॥
चालणिआंतु बरवें तें खिरें । मग खडा ढेंप चि उरे ।
तैसा दुर्जनु सांडी निर्धारें । दोषु चि घे ॥ ४ ॥
विविध शास्त्रांचिया राशी । जरि किजे दुर्जनांपासिं ।
परि तो बोधु मानसीं । घे चि नां ॥ ५ ॥
समुद्रीं सिंपीचां पोटीं । स्वातितोय पडे संपुटीं ।
तेथ मुक्ताफळें गोमटिं । निफजतीं ॥ ६ ॥
तें चि तोय कर्दळीगर्भीं पडे । तरि कर्पूरु चि जोडे ।
व्याळमुखीं पडे । तैं विष होये ॥ ७ ॥
जैसा आधणीं पडला हरळु । तो संगास्तव नोहे मवाळु ।
तैसा बहुतीं शास्त्रीं बोधिला खळु । तो मृदु नोहे ॥ ८ ॥
[3]षिरें कोळिसा[4] धूतला । तो अधिक कृष्णवर्णु जाला ।
तैसा दुर्जनु सर्वशास्त्रीं बुझाविला । दोषु न संडी ॥९॥
कूर्माचिये पाठि । मृदत्वाकारणें कष्टीं[5] ।
थोर किजे आटि । परि मृदु नोहे ॥ १० ॥
तैसा दुर्जनु अनेगिपरि । बुझाविजे सर्वप्रकारी ।
ते दुष्टबुद्धि शरीरी । हूनि न वचे ॥ ११ ॥

---

१ आश्रय करतात. २ गेला आहे वास ज्याचा असें ह्मणजे निःशेष. हा शब्द कोठें सांपडत नाहीं. ३ क्षीरें.—दुधानें. ४ कोळसा. ५ अट्टहास, कष्ट.

तोय पडे गिरिकुटां । तें धांवत चि ये तळवटां ।
तैसें सिकविजे दुष्टां । तें स्थिर नोहे ॥ १२ ॥
नां तरि *अमृत सांटविलें कांचभांडीं। तें काई जाणे तेयाची गोडि।
तैसा दुर्जनु नेघपे गोडि । अध्यात्माची ॥ १३ ॥
तंव रामु ह्मणे रुषिराया । कैसे गुण होआवे उपदेशावेया ।
तें सांगिजे गुरुराया । कृपा करुनि ॥ १४ ॥
तंव गुरु ह्मणति पारु । जो देखिजे सदाचारु ।
ब्राह्मणु क्षत्री वैश्य शूद्रु । भलेता हो ॥ १५ ॥
स्वकर्मीं निपुणता । शास्त्रार्थु पुसे चालता ।
तो चि कीजे अध्यात्मवेत्ता । निगुणपें ॥ १६ ॥
सर्वशास्त्रीं चतुरु । वरि सात्विकु स्वाक्षरु ।
तयासी बोधु कथिलेयां थोरू । धर्मु असे ॥ १७ ॥
हें येकांतीं भोगावें । आत्मज्ञान साधावें ।
अनभौनि भोगावें । तो चि सिक्षु ॥ १८ ॥
मनोभावीं निर्मळु । सदाकाळीं निश्चळु ।
निर्मळत्वें केवळु । निर्मळराशि ॥ १९ ॥
धर्मशीळु आणि सखोलु । वचनीं सत्यबोलु ।
प्रज्ञार्थी प्रतिमलु । दुजा नाहिं ॥ २० ॥
देवीं धर्मीं रतु । नावडे जीवहंतु[1] ।
पाहातां उत्पातु । आथि चि नां ॥ २१ ॥
अहिंसकु तत्वता । विशेषें गुरुभक्ता ।
धर्माधर्मीं ज्ञाता । तो सिक्षु कीजे ॥ २२ ॥
धन पुत्र कळत्र । शरीर प्राणु पशुजात ।
समस्त गुरुसमार्पित । कीजे देखां ॥ २३ ॥

---

* अमृत. १ जीवांचें हनन करणारा अथवा जीवाचें हनन. परंतु पहिलाच अर्थ बरोबर आहे. कारण पुढच्या ओवींत ' अहिंसकु ' हें पद आलें आहे.

सदुत्तरु सत्यवाणी । जेणें तिर्थपर्वणीं ।
सत्पात्रीं करी भजनी । तो सिक्षु कीजे ॥ २४ ॥
जो सर्वभूतीं । दया दे समस्तीं ।
वचनीं नाहिं नास्ति । तो सिक्षु किजे ॥ २५ ॥
संतां महतांची आर्ति । सत्यबुद्धि संपूर्ति ।
जयासिं असे धृति । तो सिक्षु किजे ॥ २६ ॥
गंहिरु आणि गंभीरता । उदासु आणि पवित्रता ।
सात्विकु आणि श्रोता । धर्मग्राह्य ॥ २७ ॥
धर्मकथा आवडे गोड । संतसेवेची बहु चाड ।
अनृताचें नाहिं कोड । तो सिक्षु किजे ॥ २८ ॥
जयासिं कृपा कारुण्य बहुत । सदा निश्चळचित्त ।
जयाची समतादृष्टि निश्चिंत । सर्वभूतीं ॥ २९ ॥
व्रती न करि भंगु । नांवडे परावियें वस्तूचा संगु ।
परब्रह्मअभ्यासीं चांगु । भरु जयासी ॥ ३० ॥
असति वस्तु न वंची । दैन्यत्व कहिं न शोची ।
जेथ नवाई प्रज्ञेची । तो सिक्षु किजे ॥ ३१ ॥
ज्ञानदेउ ह्मणे निवृत्तीचा । हा अध्याउ संपला सिष्यलक्षणांचा ।
जें बोलिली वसिष्टरुषीची वाचा । ते चि सांघितली ॥३२॥
आतां संतांचें लक्षण । पूसतुसे रामराणा ।
संसारु तारावया कारण । ते कवण पूरुष ॥ ३३ ॥
कैसीया उळखावे खुणा । कैसें त्यांचें प्रतिमालक्षण ।
गुरु करावे ते कवण । सांगा स्वामि ॥ ३४ ॥
बोलतुसे वसिष्ठरुषेश्वरु । जो परवस्तूचा अवतारु ।
किं ज्ञानमूर्तिसागरु । परमेश्वरपरायेणु ॥ ३५ ॥
निरसावेया संसारअंधकारु । जो केवळ ज्ञानदिनकरु ।
भवसमुद्रींचें तारु । ते चि होति ॥ ३६ ॥

---

१ पूर्णपणें.

संसारुअपस्मारें । भूतें चेष्टितें अपारें ।
त्यासी मुक्ति द्यावया निर्धारें । अवतरले ॥ ३७ ॥
लागलिये भवव्याधि । जयांचें दर्शन दिव्य वोषधि ।
जे सोडविती भवबंधी- । आंतुनिया ॥ ३८ ॥
परिसेंसिं लोहा जाली भेटि । नुरे चि लोहपणांची गोष्टि ।
तैसा जयाची कृपादृष्टि । ते महानुभाव ॥ ३९ ॥
जयां संतांचेनि समागमें । नुरतीं चि दुष्कृतें कर्में ।
ते उपदेसिती तरी पावे । मोक्षपद ॥ ४० ॥
ते नेणती उत्तममध्यम । तेयांसि समान लोष्ट हेम ।
मानापमान सुखश्रम । सारिखे चि ॥ ४१॥
जे पवनाभ्यासिं कुशळ । निरामय निर्मळ ।
आंगकांति सोहज्वळ । विभूतिस्नानें ॥ ४२ ॥
तोय पत्र वारा । हें जयांचेया आहारा ।
जयांसि वसावेया डोंगर । गिरिगव्हरें ॥ ४३ ॥
जैसा रवि सर्वरसांतें शोषी । वैश्वानरु सर्वांहि ग्रासी ।
तैसें जें पडिलें पात्रासी । तेंचि पवित्रें ॥ ४४ ॥
येवंविध जे महापूरुष । इये सृष्टीचे तारक ।
जयांचेन हें त्रैलोक्य । तरतसे ॥ ४५ ॥
तत्त्वमस्यार्थु । जयांचां हृदयीं असे जागतु ।
जयांचा मनोभाव सतंतु । परब्रह्मीं ॥ ४६ ॥
जयांसिं शत्रुमित्र इयें दोन्हि । उदक आणि वन्हि ।
लोह आणि कांचनीं । समता देखती ॥ ४७ ॥

---

१ या ओवीवरून श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या मतें 'भूतसंचार' हा एक अपस्माराचा ह्मणजे दुष्टवायूचा प्रकार आहे, असें दिसतें. हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. २ सर्व इंद्रियांत रसना ही बलवत्तर आहे, अशाबद्दल श्री ज्ञानेश्वरींत उल्लेख आहे.

खडण आणि कामधेनु । कल्हारें[1] आणि कांचनु ।
हिंवरु आणि चंदनु । सारिखा चि ॥ ४८ ॥
चिंतामणि आणि पाषाणु । कल्पतरु आणि अंजनु ।
बावनु आणि लसणु । समता देखति ॥ ४९ ॥
रंक आणिक ईंद्रु । दर्पणु आणि चंद्रु ।
थिल्लरु आणि समुद्रु । समता देषती ॥ ५० ॥
पिपीलिका आणि ब्रह्मावरि । जीव वर्ततातीं संसारीं ।
समता सर्वभूतीं निर्धारी । तो चि संत ॥ ५१ ॥
तवं रामु म्हणे स्वामी । गुण परिसतां चि सांडिलों भ्रमीं ।
तयांचां दर्शनीं संसारश्रमीं । वेगळेयां होइजे ॥ ५२ ॥
तवं वसिष्ठ ह्मणती राया । तुह्मां अवतारांसि अज्ञान काह्या ।
तुं परब्रह्म परिकी माया । वेष्टलें असा॥ ५३ ॥
हे तुझी चि भाटिवें[2] । आह्मी करित असो स्वमेव ।
तुज नराकृति अवेव । परब्रह्म तें तु ॥ ५४ ॥
तुं मायावेष्टितु । आमतें असासि पूसतु ।
आह्मि सांगावी साध्य जे वस्तु । ते चि तुं पैं ॥ ५५ ॥
तुज अमूर्ताकारणें । लागलीं षट्दर्शनां भांडणें ।
वेदु आणि पुराणें । नेणती चि तुज ॥ ५६ ॥

इतिश्री योगवासिष्ठे वसिष्ठरामसंवादे सिष्यसंतप्रशंसानाम तृतीयोध्यायः ॥ ३ ॥

## ॥ अध्याय चवथा ॥

आतां रामु ह्मणे वासिष्ठ रुषि । षड्दर्शनें आपुलाली भाषी ।
काइ बोलती हे आ्ळुकि[3] । पुसावेयाचीं ॥ १ ॥

१ कल्हार=कमल. परंतु येथें ‘ कल्हारें ’ असें रूप असून त्याची कांचनाशीं सांगड घातली आहे, तेव्हां धातूशीं पुष्पाची सांगड योग्य होणार नाहीं, ह्मणून कल्हारें हा शब्द, ‘ कल्हई ’ ज्याची करतात तें ‘ कथील ’ अशा अर्थी घ्यावा.
२ भाटपण, गुणवर्णन. ३ आवड, भूक.

तवं गुरु ह्मणती पारु । विस्तारें सांगतां ग्रंथु घेइल पसरु ।
ठाकैल विवरु । अध्यात्माचा ॥ २ ॥
परि तुझें पुसणें निकें । समस्तहि परिसावें लोकें ।
मग जया जें ठाके । तें तो अनुष्टु ॥ ३ ॥
परब्रह्मांची मातु सांगतां । नाहिं वक्ता नां श्रोता ।
विष्णु जाला योगनिद्रिता । अभ्यासावेया ॥ ४ ॥
आतां मिमांसिकांचें बोलणें । स्वकर्तव्य करणें ।
स्वर्ग पाविजे आचरणें । निर्धारेंसिं ॥ ५ ॥
जें जिये आश्रमीचें कर्म । तें आचरिजे सवर्म ।
हें बोलणें चि परम । मिमांसिकांचें ॥ ६ ॥
ईश्वर करणें । प्रमाण नोहे जाणणें ।
स्वकर्तव्य प्रमाणें । येर लटिकें ॥ ७ ॥
जैसें देउळ रचितां । उंच भूमिका निश्चिता ।
घडतेन आधारें तत्वता । पावतु जाये ॥ ८ ॥
मग कळसोत्तर काम टांकि। तैसि चि उर्धगति आचरण विशेषिं।
तें तयाचें कर्तव्य किं । ईश्वरें केलें ॥ ९ ॥
नांतरि आडु खणतां । जवं खणे खालुता ।
तवं अधोगति सर्वथा । तयांसी होये ॥ १० ॥
तैसें स्वर्ग नर्क भोगणें । तें आपुलेन कर्में जाणणें ।
तेथ आणिक कोण्हि निर्धारणें । लागे चि नां ॥ ११ ॥
शत अश्वमेधां कीजे । मग ईंद्रु होइजे ।
हे भक्ति किं कर्म जाणिजे । आपुलें देखां ॥ १२ ॥
येथ कर्तुत्व प्रमाण निश्चित । येंज्ञ कीजे मीम्मांसिकमत ।
भक्ति अप्रमाण तत्वता । आमचां ठांई ॥ १३ ॥

---

१ राहील. २ मानेल सांहील. ३ येथें कारण हा शब्द मागाहून लाल शाईनें समासांत घातला आहे. चरण रेषा व ओवींचें अंक हे लाल शाईनें घातले असल्यानें अर्थात हा ‘ कारण ’ शब्द पोथी तपासतानां च घात्तलेला असावा हें उघड होत आहे.

आतां नैयाईकासी प्रमाण । षोडश पदार्थ जाण ।
तेथ ते स्थिराउनी अंतष्करण । परिस बापा ॥ १४ ॥
प्रमाण प्रयोजन संशय । दृष्टांत सिद्धांत अवेव ।
कर्तुत्व भाषनिर्णय । वादछळन ॥ १५ ॥
आतां नैयायिकांची मातु । वसिष्ठ सांगे परिसे रघुनाथु ।
तें सांगैल निवृत्तिनाथसुतु । ज्ञानदेॐ ॥ १६ ॥
वितंड जल्पती । निग्राहादि षोडश ह्मणती ।
प्रमाणादि बोलती । निर्धारेंसिं ॥ १७ ॥
षोडशपदार्थज्ञाने निरुति । नैयायिक बोलती ।
ईश्वरप्रसाद ह्मणती । मोक्षु असे ॥ १८ ॥
चार्वाकां सिधांतु अनेछा । बोलताती स्वईच्छा ।
तें सांगतसे अनीछा । ज्ञानदेॐ ॥ १९ ॥
तंव चार्वाकीं बोलिलें । आणिक नांहिं उरलें ।
मरणाद्यो साधलें । मोक्षपद ॥ २० ॥
येथ करणें नाहिं स्वभावें । मृत्यु जेधवां पावे ।
तेणें सहज जीवें । मोक्षु पाविजे ॥ २१ ॥
भस्मीभूत शरिर जालें । तरि सांग पां कवण मेलें ।
आणि मागुतें आलें । तें कवण सांग ॥ २२ ॥
चार्वाक ह्मणती तें परियेसां । आह्मां दूषण ठेवित असा ।
तरि यासी दृष्टांतु कैसा । तो अवधारिजे ॥ २३ ॥
उदकीं बुडडा उपणला[1] । तेथ चि लयातें पावला ।
तो चि मागुता उपणला । ऐसें घडे ॥ २४ ॥
कण भूमीमध्यें पेरिले । ते सर्व हिं अंकुरैले ।
ते चि मागुते जन्मले । ऐसें घडे ॥ २५ ॥
तैसें पातलेयां देहपातां[2] । मोक्षु होये तत्वतां ।
ऐसें मत निश्चित । चार्वाकांचें ॥ २६ ॥

---

१ उपजला. २ देह पाताला पावला असतां=देह पडला ह्मणजे.

आत्मा तो आधीं चि नाहिं । ऐसें आपुलालिये ठाईं ।
प्रतिपक्षीं पाहिं । प्रतिपादिलें ॥ २७ ॥
तवं तेथ भास्कर बोलती । कर्मा पासून ब्रह्म हे निरुति ।
तरि कर्म त्यजूनि वर्तती । ते कवणेंगुणें ॥ २८ ॥
सांडूनि कर्मफळाचा हेतु । ब्रह्मकर्मसमारंभ वस्तु ।
नेणती तेथिचा संकेतु । त्यासी काई ह्मणावें ॥ २९ ॥
तवं इये चि दर्शनींचे आणिक । भटाचार्य बोलती प्राज्ञिक ।
तें चि सम्यक । जाणावें पैं ॥ ३० ॥
तरि कर्म करावें । कर्मफळ इश्वरीं अर्पावें ।
अर्पूनी उगयां चि राहावें । निर्धारेंसी ॥ ३१ ॥
मग ईश्वर जाणे तें करु । ऐसा भास्करदर्शनाचा निर्धारु ।
आणिकहि विवरु[१] । बोलताति ॥ ३२ ॥
भट निर्धारें बोलती । स्वर्गकामादि यज्ञ निरुति ।
आमचें षट्कर्म निश्चिति । प्रमाण गा ॥ ३३ ॥
त्रिदंडियांचेनि मतें कैसें । गृहस्तापासूनि चतुर्थ असें ।
कर्म आह्मीं करावें ऐसें । ह्मणति गा ॥ ३४ ॥
येक दंडियां होआवें जेणें । योगारूढ होउनि तेणें ।
उत्तम प्रणउ अभ्यासणें । नेमेंसीं ॥ ३५ ॥
ऐसें चार्वाकदर्शनींचे समस्त । सेवावर आइकौनी निश्चित ।
श्रीरामु पुसे वेदांत । काइ बोले ॥ ३६ ॥
आतां निवृत्तिचरणप्रसादें । हर्ष निर्भर आनंदें ।
वेदांत बोलणें विनोदें । ह्मणे ज्ञानदेउ ॥ ३७ ॥
बोलती वेदांती । येकले सोनें हें निरुति ।
रचनाविशेषें अलंकार स्थिति । विविधें नावें ॥ ३८ ॥
अलंकार नामोच्चारें । त्रय[२]लिंग नाम्ना आधारें ।
परि पाहतां निर्धारें । सोनें येक चि ॥ ३९ ॥

---

१ स्पष्टीकरण २ अलंकार हे भिन्नलिंगी आहेत, परंतु सुवर्ण एक च लिंगी आहे.

नातरि गिरकुटीं । अळंकार रचिलें कोटि ।
स्वामी परिवारला धुर्जेटि । आकृति समंधें ॥ ४० ॥
सतीस दंडयुधीचा प्रकारु । चातुरंग सैन्यादि अळंकारु ।
निर्धारें डोंगरु । येक चि किं ॥ ४१ ॥
तैसें 'तत्वमस्यादि' वाक्य निरुति । 'सर्वं खल्विदं ब्रह्म' हे निरुति ।
" एकमेवाद्वितीयं नास्ति " । निर्धारेंसी ॥ ४२ ॥
पाहे पां नळिकाबंधन शुकाचें । नातरि चेतन स्वप्नीचें ।
राज्य अथवा बंधन साचें । घडतसें ॥ ४३ ॥
तैसा बंधु तो निःशेष । कर्म तें उपाधीक ।
ह्मणोनि शिखा सूत्र कर्मत्यजीं विशेष । करुनी वर्तती ॥ ४४ ॥
इतुकें आइकौनु दशरथ नंदनु । ह्मणे गोसावि कृपा करुनु ।
बौध दरुशनाचा अनुमानु । तो अनुवादिजे ॥ ४५ ॥
सांगा बौध दरुशनाची कथा । ते जैसे आहाति वर्तत ।
ते आइक तत्वतां । रघुनाथा ॥ ४६ ॥
तवं बौधीं विचारिलें । घटाकाश मठाकाश भलें ।
महदाकाश बोलिलें । तिहीं शून्यें ॥ ४७ ॥
तिहीं शून्यें जिये ठाईं । लया जाती पाहिं ।
तें शून्य चि नावें कंहिं । आन न कीजे ॥ ४८ ॥
तवं जैनीं निर्वचिलें[1] । अष्टादश दोष भले ।
अनुक्रमें बोलिलें । तें आईक रामां ॥ ४९ ॥
क्षुधा तृषा भय निंदा लज्या मौन । रोग चिंता जरा मरण ।
आहार विस्मृति स्वेद गुण । निद्रा व्यसन ॥ ५० ॥
राग द्वेष निंदा निरुति । अष्टादश दोष बोलीजति ।
या विवर्जित निरंजनु ह्मणती । निर्धारेंसी ॥ ५१ ॥
' अहिंसा परमोधर्म ' । हिंसादि न कीजे कर्म ।
येवंविध शुध धर्म । जैन बोलती ॥ ५२ ॥

---

१ बोलले.

हातीं मयुरपिछ कूचि । मस्तकीचे केंस लुंचि[1] ।
निरामय[2] होउनी शुची । वसे गौशालेसी[3] ॥ ५३ ॥
येवं अष्टादश दोष विवर्जितां । निरंजनु पाविजे तत्वतां ।
ऐसें जैनदर्शन वोलतां । आईकिंजे रामां ॥ ५४ ॥
सांख्य पूरुष प्रकृति । योग पातांजळी ह्मणती ।
यम नियम प्राणायाम प्रत्याहार निरुति । धारणा ध्यान ॥ ५५ ॥
आसन समाधि येणें । अष्टांग योगें करुनी जाणणें ।
विद्या राग द्वेष अस्मिानिर्गुणें । निर्विषय ॥ ५६ ॥
क्लेश पंचक निवृत्ति जगीं । जीवपरमात्मायांचां योगीं ।
मोक्षु ह्मणती उर्ध मार्गीं । निर्धारेंसीं ॥ ५७ ॥
शिवपूजा करिती । ते शैव बोलिजती ।
शक्तिध्यानें असती । ते शाक्तजाण ॥ ५८ ॥
विष्णुतें अर्चिती । ते वैष्णव बोलिजती ।
गणेशध्यानीं निपुणजती । ते गाणपत्य ॥ ५९ ॥
सूर्यो देखिलेयाविण कहिं । जयांतें अन्न नाहिं ।
ते सौर वोलिजती पाहिं । ऐसे पंचायतन ॥ ६० ॥
आणिक आपुलालिया वासनां । कुळदेवता कुळाचारु गहना ।
देशधर्म आनाना । मर्यादा नाहिं ॥ ६१ ॥
तवं बोलिले सद्गुरु । या अर्थासी नाहिं पारु ।
येक धरुनि राहे जो नरू । तत्वज्ञान ॥ ६२ ॥
तवं बोलिला ज्ञानदेउ । हा चौथा जाला अध्याउ ।
जें बोलिला रुषिराउ । वसिष्ठ गुरू ॥ ६३ ॥

इतिश्री योगवासिष्ठे वसिष्ठरामसंवादे षट्दर्शनाववरणं नाम चतुर्थोध्याय: ॥ ४ ॥

---

१ काढणें, बोडणें. २ व्याधि अथवा उपाधिरहित. ३ येथें ' गौ ' चे ऐवजीं ' पौ ' दिसतो.

## ॥ अध्याय पाचवा ॥

संस्कृताची मऱ्हाटी बोली । जैसी सुवर्णाची पातळ केली ।
नातरि लेंभाट वाटुनी रांधिली । आंबील जैसी ॥ १ ॥
नां आंबील जेवणें बहुतांचें । षडरसीं भोजन समर्थांचें ।
मऱ्हाटिये वरि भलतेयाचें । चित्त बैसे ॥ २ ॥
जऱ्हीं पढीनले संस्कृत श्लोकु । परि मऱ्हाटियां बुझाविजे लोकु ।
मिं नोबलें अधिकु । संस्कृताहुनी ॥ ३ ॥
जरि संस्कृतीं गुंपे[1] । तरि येथें पाहतां सोहपें ।
मिं आनें आन जल्पें । तरि निवृत्तीची आण ॥ ४ ॥
ह्मणाल कां करावी मऱ्हाटी । कासया उपसावि आटि ।
आत्मा ठेवुनी कटीं । पृष्टीभंगु[2] ॥५॥
हे केलिया मऱ्हाटी । जोडती पुण्याचिया कोटि ।
तत्वज्ञान कर्णपुटीं । भोगणें घडे ॥ ६ ॥
हें आइकिलेंयां माझें बोलणें । खळांचीं जातीं अवलक्षणें ।
तेयां घडे अभ्यासणें । अध्यात्मयोगु[3] ॥ ७ ॥
वेदांती सिद्धांती अध्यात्मवेता । पाहावें अधीक उणें संस्कृतां ।
बोलिला तरि कोपतां । विषादु नाहीं ॥ ८ ॥
माझी प्रतिज्ञा ऐसी । जिये ग्रंथीचीं बोली जैसी ।
निवृत्तिकृपावशीं । पुरो चि लागे ॥ ९ ॥
तवं श्रीगुरु निवृत्तिनाथें । ह्मणितलें असो हें परतें ।
आपण वर्णावें आपणयातें । तरि तत्वबोधु नाशे ॥ १० ॥
असो वसिष्ठ रुषीतें । प्रष्णु केला रघुनाथें ।
सर्वदा अभ्यासावें योगातें । किं युगपरत्वें ॥ ११ ॥

---

१ कठिण पडेल, काठिण्य येईल तर. २ पाठीचा कणा मोडे तों. ३ यावरून संतांनीं ' मराठींत ' ग्रंथरचना कां केली हें उघड होतें.

यावरिं रामाचये मनींचें जें । जाणितलें रुषिराजें ।
यासि अपेक्षित युग धर्मांचें । जाणवसे ॥ १२ ॥
तरि सांघों युगधर्म । निरसूनि अज्ञानतम ।
अज्ञुत्री यांचे मनोधर्म । निरसतीनां ॥ १३ ॥
पुसतुसे आर्ति । परि राजमदु चित्तीं ।
तो निरसावा बहु प्रतीती । दाउनियां ॥ १४ ॥
मग बोलीला श्रीगुरुनाथु । हा युगधर्मु समस्तु ।
वेदें बोलिला यथोक्तु । तें सांघों तुज ॥ १५ ॥
तरि कृतयुग बत्तीस लक्ष । तेथ येकविस ताड उंच मनुष्य ।
तेयांसि येक लक्ष आयुष्य । दो अवस्था ॥ १६ ॥
तेयांचे अस्थिगत प्राण । इंद्रियां नांदणुक स्वल्प जाण ।
निश्चिळत्व करणें । बहुतेयांसिं ॥ १७ ॥
मनाची प्रवृत्ति थोकुडी । निश्चळत्वाची अपार गोडी ।
कृतयुगीची परॆवडी । बरवि देखां ॥ १८ ॥
ते गमन करिती । तरि पदीं पदीं ग्रामु उलंघिती ।
दिनमानें काई करिती । तें चतुरीं जाणावें ॥ १९ ॥
तिये युगीं धर्मु आत्मउपास्ति । जे यथोक्त आचरती ।
तें चैतन्यप्राप्ति पावती । निर्धारेंसीं ॥ २० ॥
तेथ धर्मु हे उक्ति । जयां घडे निरुति ।
अधर्मास्तव पतित आथी । खालुतें येणें ॥ २१ ॥
विकारनिमित्यें अंतु । तेणें होये देहपातु ।
ते जन्मती त्रेतांतु । भर्वसेनी ॥ २२ ॥
त्रेत सोळा लक्ष । मानवा दाहा सहस्र आयुष्य ।
उंच चौदा ताड मनुष्य । रघुनाथा ॥ २३ ॥
येथ मुक्ति हा धर्मु । जे करिती सवर्मु ।
त्यजिती संसारश्रमु । अतीत होउनी ॥ २४ ॥

१ उत्सुकतेनें ( तृतिया ) २ लहान, थोथीशी; ३ प्रकार.

मग ते हृदयभूमिके । पेरिती शांतीचीं रोपें ।
सिंपती उदकें । श्रद्धेचेनि ॥ २५ ॥
तिये सविस्तरे अंकीं । बैसौनियां येकाकी ।
मग भग्ति करिती निकि । यथोक्त पैं ॥ २६ ॥
तयां वैकुंठविळासु । ऐसां ठाईं होये वासु ।
या फळातें हें भक्तिलेशू । निर्धारेसीं ॥ २७ ॥
येथ यज्ञु अधर्मु बोलिजे । तो जिहीं मानुषीं कीजे ।
तितुकां जन्मिजे । द्वापारांतु ॥ २८ ॥
द्वापार आठ लक्ष । तेथ मनुष्या सहस्त्र आयुष्य ।
सप्त ताड उंच मनुष्य । जाणावें पैं ॥ २९ ॥
तेथ यज्ञु हा धर्मु जे करिती । तेयां होये स्वर्गप्राप्ति ।
जाणावी हे निरुति । प्रज्ञावंतीं ॥ ३० ॥
तेथ तीर्थ क्षेत्र व्रत दान । हा समस्त अधर्मु जाण ।
जयां घडे तयां प्रमाण । कळियुगीं जन्म ॥ ३१ ॥
च्यारि लक्ष कालियुग देखां । मनुष्या आयुष्य शत वारिखां ।
कळीं शतायु पुरुषां । ऐसें वेदु बोले ॥ ३२ ॥
तेथ तीर्थ क्षेत्र व्रत दान । हा कळींधर्मु गहन ।
जयां यथोक्त घडे तयां पावन । अंत्राळ फळे ॥ ३३ ॥
हा चि मध्यमु घडे । तरि अष्टदेवयोनि होये फुडें ।
जे आचरती कोडें । युगधर्मु ॥ ३४ ॥
हे चि कनिष्ठ करिती । तरि अधोयोनी होये प्राप्ति ।
हिंसामात्रें बोलिजती । महारौरव ॥ ३५ ॥
कळीं हिंसा हें पाप आइक । पापास्तव नरक ।
मनुष्य हीनसत्व अविवेक । धर्मरहित ॥ ३६ ॥
चौहिं युगधर्मीं वर्ततां । मोक्षु नाहिं सर्वथा ।
आत्मज्ञानेविण रघुनाथा । निश्चितां नोहिजे ॥ ३७ ॥

---

1 अंतरालीं त्याचा वास होतो. अंतराल–आकाश.

अणुमात्र भक्ति विकरलें[1] । तेणें नौ सहस्र आयुष्य तुटलें ।
युगायुग गतलें । सोळा लक्ष ॥ ३८ ॥
ऐसें चि विकार गती । दशांशे आयुष्यें तुटती ।
त्रययुगें अधर्मे जन्मती । कळीआंतु ॥ ३९ ॥
द्वापाराचां अंतीं कैसें । अघोर युग जन्मतसे ।
तयां नांवं कळि ऐसें । बोलिलें पैं ॥ ४० ॥
हा चौहीं युगींचा धर्मु । सांगितला तुज सवर्मु ।
यांतु उधरिजे ऐसा श्रमु । कांहिं असे ॥ ४१ ॥
जें बोलीलें वेदें । तें वसिष्ठें सांगितलें संस्कृतअनुवादें ।
मियां मऱ्हाटियां विनोदें । अनुवादलां ॥ ४२ ॥
ॐतत्सदिति श्रीयोगवासिष्ठे । वसिष्ठरामसंवादे चतुर्युगधर्म विवरणं नाम पंचमोध्यायः ॥ ५ ॥

---

## ॥ अध्याय सहावा ॥

श्रीगुरुनाथाय परमात्मनेनमः ।

आतां रुषीतें म्हणतसे रामु । गोसावि सांगितला युगधर्मु ।
कैसा चाळितां गृहस्थाश्रमु । मुक्ति असे ॥ १ ॥
या शब्दां रुषि कांटाळला । घडि येक मुर्च्छागत जाला ।
मग सावध होउनी बोलिला । रामचंद्रासिं ॥ २ ॥
तुं पुसतांसि कवणि आर्ति । हें आइकिलीयां चित्तवृत्ति ।
नेणों गेली केउतीं । स्वस्थ नाहिं ॥ ३ ॥
हें आइकत[2] चि गा सुभटा । लंघिजती गिरिकपाटां ।
इये संसारा ऐसा वोखटा । आश्रमु नाहिं ॥ ४ ॥
जें कीजे पाणिग्रहण । तें असे अज्ञानपण ।
सर्वें चि लागे विंदाण । मन्मथाचें ॥ ५ ॥

---

१ विकार पावणें. २ मर्मी लक्ष्य. श्री. ज्ञा. १३×२७१.

न वर्णवे बरवेपण । श्रृंगारीं न रिगे मन ।
ते अधोगतीसी कारण । आणिक नाहिं ॥ ६ ॥
नां ते स्त्री नोहे विवंर्तु[1] । ते भवसमुद्रीचा आवर्तु ।
जीव ग्रासावेया मुर्तिवंतु । काळु जैसा ॥ ७ ॥
ते वनिता नव्हे भूली । ना तरि अविद्या जन्मली ।
अधोगति चि आली । मूर्ति वेषें ॥ ८ ॥
नां ते भूलीरूप गहनी । पूरुषु मोहावेया मोहनी ।
त्रिभुवन ग्रासावेया लागौनि । व्याघ्री ते ॥ ९ ॥
सोडुनी कटाक्षबाण । विंधे पूरुषांचे प्राण ।
अवेव दाउनी आपण । ग्रासी जगा ॥ १० ॥
नां नां ते भ्रंग्नि[2] । पूरुषु तृणु ते वन्हि ।
जग ग्रासावेया लागौनि । मूर्ति जाली ॥ ११ ॥
ते काळसर्पाची गरळ[3] । मूर्तिमंत हळाळ ।
नांतरि केवळ । अधोगति ॥ १२ ॥
श्रृंगारक्षेत्रीची व्योंळी[4]। किं विषयव्याघ्राची वंशजाळी[5] ।
नां ते क्लेशतरूची डाहाळी । वनितारूपें ॥ १३ ॥
ते नांदवी अनंग पीठीं[6] । किं इंद्रिय चोरांची दरकुटी[7] ।
निरयनदीचां तटीं । नेॐ काज ॥ १४ ॥
पूरुषु पर्वतु ते वणवा । ते निरय पंकीचा दिवा ।
अधःपात करावेया जीवा । ते चि जाणे ॥ १५ ॥
वनिता अज्ञानाची खाणि । भूलि रूपांची लाणि[8] ।
नां ते मुक्तीसी नागवणि । चांडाळि ते ॥ १६ ॥
घराश्रमु तो करि भ्रमु । चळे आश्रमधर्मु ।
नाठवे देॐ धर्मु । तीतें पुरवितां ॥ १७ ॥

---

१ भोंवरा, भ्रम. परंतु येथें ' भ्रम ' घ्यावा, कारण पुढें आवर्त=भोंवरा आहे च. २ भ्रम करणारी. ३ येथें ' ळ ' मागाहून लिहिलेला आहे. गरा=विष. ४ सर्पिणी. ५ बांबूची जाळी. ६ पीठ=सिंहासन ७ भीति उत्पन्न करणारें स्थान, दरी. ८ शेवट.

जिचीया संगति । सप्त वेसनें प्राप्त होतीं ।
जाइजे अधोगती । पित्रें सहित ॥ १८ ॥
अनुसरली ऐसी वाटे भ्रतारा । तरि मारवि सहोदरा ।
हें चि विपरीत जें भ्रतारा । करी जीवनाशु ॥ १९ ॥
मुर्खत्व अनृत साहस माया । हे स्त्रियांचे स्वभाव गा रघुराया ।
अशुचि निर्दयत्व माया । हे सहज चि असे ॥ २० ॥
बोले ते माव । वेशीक लावी ते स्वभाव ।
दावी हावभाव । भूली पाडी ॥ २१ ॥
गृहस्थाश्रमीचे आचार । असती बहुत प्रकार ।
मज सांगावेया स्थिर । मन नोहे ॥ २२ ॥
देउ आदरिलें इछाभोजन । तेथ उठिलें चि असे विघ्न ।
बेळि करुं आदरिलें दान । तो पाडिला पाताळीं ॥ २३ ॥
ऐसें हें अनेकधा । सांगावेया नुपजे श्रद्धा ।
स्त्रीसंनिधानें त्रिविधा । तापातें भोगिजे ॥ २४ ॥
ह्मणौनु शुकदेउ नारदु हनुमंतु । यांसी नलगे चि मन्मथाघातु ।
पळतु गेला गिरिकंदरांतु । स्वामी कार्तिकु ॥ २५ ॥
विश्व पर्वतु ते वणवा । अज्ञानमूर्तु ते अंधकारु जाणावा ।
विश्वहृदय सर्वा । व्यापूनि असे ॥ २६ ॥
वनिता अज्ञानांची खाणी । भ्रमय रूपाची गवसणी ।
नां ते झांकोळावेया ज्ञानतरणी । अविद्या अभ्र ॥ २७ ॥
ते सकळ चिंतेचें घर । किं असाराचें असार ।
क्षणामध्यें यमपूर । अवलिळा दे ॥ २८ ॥
संसाराचें आदिमूळ । गर्वादि अंतीचें कुळ ।
स्फुरे अविद्या सकळ । जियेस्तव ॥ २९ ॥

---

१ अनृतं साहसं माया मूर्खत्वमतिलोभता । अशौचत्वं निर्दयत्वं स्त्रीणां दोषाः स्वभावजाः ॥ २ बळीनें ( तृतीया )

गृहचिंता विविधा । सकळै उपजति प्रसिद्धा ।
स्वार्थ चित्तबाधा । तितीचि जाण ॥ ३० ॥
तिचे चिंतेचेया अधावती । मावळे प्रज्ञेची जोती ।
आत्मज्ञान स्मृति । नाहिं होणे ॥ ३१ ॥
जगीं हे कुटुंबचिंता । दुरंधर गा रघुनाथा ।
सर्व अकृत्यें येथ । निफजती पैं ॥ ३२ ॥
चिंतेवरि चिंता । दिनुरात्रि सोसितां ।
उसंतु[1] येक पाहातां । आथि चि नां ॥ ३३ ॥
ऐसी जे वनिता येकि । ते मतिमूळ उत्पाटकी ।
नां ते उन्मेष द्रुम ग्रासकी । विद्युलता ॥ ३४ ॥
प्रज्ञेचिये निधि । वरि उठिली हो काज अविधि ।
कां साधितां आत्मसिद्धि । महा विघ्न ॥ ३५ ॥
ते वनिता नव्हे वैरि । जाणावी सर्व प्रकारि ।
विश्व वधितसे निर्धारी । विषयशस्त्रीं ॥ ३६ ॥
आंगीं तारुण्य स्वरुपता । कांति दिसे उदिता[2] ।
ते येक दिसीचिया चिंता । जळोनु जाये ॥ ३७ ॥
बळ प्रताप प्रौढी । अंगीं असे गाढि ।
तें अणुमात्र चिंतेचिया धाडि[3] । नाहिं होये ॥ ३८ ॥
विवेक तर्क मती । सर्व शास्त्रीं ज्ञातव्य स्थिति ।
जाणे आत्मसंविति । गुरुमुखें ॥ ३९ ॥
जाणे प्रपंचा अभासु । निश्चित वोळखे परेशू ।
तये बुद्धीसी होये नाशु । गृहाश्रमें ॥ ४० ॥
उपजति अनेगी उपाधी । नाशू होये धर्मबुद्धि ।
संचरों लागती व्याधी । चिंतेस्तव ॥ ४१ ॥
श्मशानाहूनु अधिक । चिंतेची होय आगळिक ।
श्रीरघुराया आईक । गृहाश्रमु हा ॥ ४२ ॥

१ विश्रांत. २ उज्वल. ३ परचक्र, हल्ला.

निर्जीवांतें स्मशान । क्षणु येकु करि दहन ।
परि चिंता जाळी गहन । उभयांतें ॥ ४३ ॥
जेंथ जिव्हारीं चिंता देख । तेथ कैचें सुख ।
मूर्ख नांदती अशेख । तिचेया संगती ॥ ४४ ॥
देखौनि तारुण्य साजिरी । विश्व घालाघाली करी ।
ते पावती परी । पतंगाची ॥ ४५ ॥
म्हणौनु ते वनिता । संशयात्मक निश्चिता ।
नेदखिजे निस्तरतां । कव्हणे काळीं ॥ ४६ ॥
निश्चळत्वाची बरवं[1] । कृष्णसर्पाचें मार्दव ।
सुष्ट म्हणौनु स्वयमेव । धरूं ये कांई ॥ ४७ ॥
तैसि वनितेची आपुलीक[2] । प्रसनवदन दर्शनीक ।
तिची विविध भजेणुक[3] । साच न मनावि ॥ ४८ ॥
विनय व्रूति पाहातां । नेदाषिजे सर्वथा ।
आविनय भुवन पतनता । पतनगृह ॥ ४९ ॥
नां ते दोषखाणि गहन । वरिपडियां[4] होईजे महापतन ।
भोगिजती यमयातनां । जियेस्तव ॥ ५० ॥
धर्मरत्न सांडी । वनिताकर्दमीं दे बुडी ।
ते जाले वरिपाडि । रौरवांसी ॥ ५१ ॥
आत्मज्ञानीं नाहिं गोडी । अपाडें[5] वनितेची आवडी ।
ते पाडिले बांदौडीं[6] । गर्भवासांचिये ॥ ५२ ॥
अनंत योगी पराभवले । पुनर्दारा सुखीं मोहावले ।
ते जळत चि राहिले । संसारवणवां ॥ ५३ ॥
नां ते दोषांचा गिरिवरु । किं ते पतनाचा सरोवरु ।
जगग्रामु सविस्तारु । वर्धतुसे ॥ ५४ ॥
सदा दोषेंसीं सनिधान । नोहे सुष्टात्मक मन ।
कपटता गहन । रघुनाथा ॥ ॥ ५५ ॥

---

१ शोभा. २ माया. ३ सेवा. ४ अज्ञानी. पण वरपडा=गुंतलेला, मोहलेला, आणि हा च अर्थ योग्य आहे. ५ फार. ६ बंदिवास.

नां ते असत्याचें घर । किं अनृताचें भाडांर ।
निश्चित मृताकार । रौरउ ते ॥ ५६ ॥
ते सकळ अकर्मांची स्छळी । अनृत रौरवादिकीं भरली
नां ते यमयातना जाली । वनिता वेषें ॥ ५७ ॥
ते अप्रत्यक्ष क्षत्रिणी । विश्वासु न कीजे कवणीं ।
प्रत्यक्ष विहित मरणीं । जाणावी ते ॥ ५८ ॥
अगा तापत्रय अग्नि । जाणावी ते भग्नी ।
विघ्नांतु श्रेष्ट विघ्नि[1] । महाविघ्न ॥ ५९ ॥
ह्मणौनि गा नरश्रेष्टा । परियसे सिष्यसुभटा ।
जातां स्वर्गाचिया वाटा । अडचणी ते ॥ ६० ॥
नां ते वनिता नोहे अव्हाट[2]। निरय[3]पुरीची राजवाट ।
अधोगती येकदाट । मूर्तिं जाली ॥ ६१ ॥
ते मायेची करंडी । विषयां भरली हांडी ।
सर्व सुखाची कुरौंडी[4] । निरयरूप ते ॥ ६२ ॥
महानिंद्य असंतुष्ट । ते दुष्टाचे दुष्ट ।
रामा हे अरिष्ट । मूर्तिमंत ॥ ६३ ॥
ऐसें स्त्रीरूप अशेष । कवणें केलें देख ।
अमृतासमान विष । मानिलें रामा ॥ ६४ ॥
ह्मणौनियां नरेशा । जाणें माझी भाष ।
हे पुरुषांसी पाश । मांडिला असे ॥ ६५ ॥
ईंद्रवणीचें फळ । बाहियाकारें दिसे निर्मळ ।
परि अभ्यंतरीं केवळ । विष चि असे ॥ ६६ ॥
तैसी वनिता बाह्यात्कारें । विमळता रूपें आकारें ।
जे केवळ निंद्य अभ्यंतरें । सांगतुसे ॥ ६७ ॥
ते अज्ञानपंकींची अळी । किं विषयइंद्रियांची वंशजाळी ।
अविद्यापर्वताची गोलांगुळी[5] । मूर्त जाली ॥ ६८ ॥

---

१ विघ्नांत फार मोठें विघ्न. विघ्नाचें स्त्रीलिंगी रूप, विघ्न करणारी. २ आडवा
३ नकपुरीची. ४ ओंवाळणी. ५ वानरी.

ते कामलोहाची सांकळा । पडिली असे विश्वाचिये गळां ।
तेथ सुटिका पुरूषां सकळां । नव्हे चि पै ।। ६९ ।।
नां ते विषय विस्तीर्ण नदि । चिंतातरूची आदि ।
विश्व ग्रासावेया व्याधि । जाली असे ।। ७० ।।
ते क्रोधाचें कुंड । किं निरयसर्पाचें तोंड ।
महा मोहोगजाची शुंड । कवळी विश्व ।। ७१ ।।
ते मूर्ताकार माया । किं लोभद्रुमांची छाया ।
ते प्रळयव्याघ्रीची काया । ग्रासी पूरूषांतें ।। ७२ ।।
ते भवसिंहांची दाढ । ते मदविटपाचें[1] बूढ ।
नां ते विषयाचे वेड । लागलें जगा ।। ७३ ।।
नां नां ते रौरवसागरीची शुक्ति[2] । दुरुनी दिसे झळकती ।
रूप पाहातां भ्रांति । प्रपंचाची ।। ७४ ।।
ते आवर्तु तृष्णांनदीचा । किं ते मछर्यमदाची वाचा ।
तिये मध्यें साच । काइ असे ।। ७५ ।।
वेधि तें जाणें बरव । करि लजेची बांगडिव[3] ।
भोळेपणांची वेडिव । ठेवी आपणेयांतें ।। ७६ ।।
आधींचि स्वरूप रमणी । वरि हावभावादिक करणी ।
तेणें पूरूषा अंतष्करणीं । मोहन पडे ।। ७७ ।।
जैसी पक्षिणी देखौनियां फुडी । अंतरिक्षपारिवां बांधे विडी ।
मग तियेवरी घाली उडी । दर्शनमात्रें ।। ७८ ।।
भूमी न विचारी अवघड सवघड । न लेखी द्रुम झाड ।
करूनि प्राणांची होडि[6] । पडे तेथ ।। ७९ ।।
त्याचें देह सरे । कां दैवयोगें उरे ।
परि स्त्री निमित्यें जाये निर्धारें । चाडेस्तवें[7] ।। ८० ।।

---

१ वृक्ष, झाड. २ शिंपी. ३ बांगणें=पिळणें, खुरटणें; यावरून हा शब्द नि-घाला असल्यास न कळे ४ फुडे =खरें. हें स्त्रीलिंगी रूप तर नव्हे? ५ हा सामासिक शब्द. ६ पैज. ७ चाड–इच्छा.

तैसें शस्त्रांचिया अणियांवरी। घालूनियां सर्व प्रकारी।
मूर्ख भोगिती नारी। पराविया ॥ ८१ ॥
ह्मणती देहासी नाहि चीरता। मग ऐसीं रत्नें भोगिता।
हें देह तत्वता। आतां चि जाऊ ॥ ८२ ॥
ऐसें शरीर करिती हेळा। दुर्लभु नेणती मनुष्यमेळा।
विषयचाडें केवळ। देती देह ॥ ८३ ॥
एवढी जीवां भवती भ्रमणी। क्लेशत्रय भवावर्त भवनीं।
येवं वनितावीण करणी। अन्यास्तव नव्हे ॥ ८४ ॥
ऐसी ते वनीता तन्वांगी। वरी दिव्य कांति आंगीं।
ते भुलवीतसे कुरंगी[1]। नादु जैसा ॥ ८५ ॥
जैसें अर्काचें[2] खीर। शुद्ध दिसे श्वेताकार।
पयासाठीं जे नर। सेवितातीं ॥ ८६ ॥
ते परिणामीं नव्हे हित। भ्रमु उपजवी निश्चित।
मृत्यु पावे तत्वता। तदनंतरें ॥ ८७ ॥
ऐसे ते परम सुखासाठीं। वनितासुख सेविती सेवटीं।
तेयांसीं पडिली आटी[3]। येरझारांची ॥ ८८ ॥
ते पाहुणे येमलोकीचे। त्यांसी आदर होती रौरवादिकांचे।
नां ते चौऱ्यासी लक्ष जीव गर्भींचे। वस्तबांधं कीं ॥ ८९ ॥
महाद्रुमु सरितातटीं। सविस्तरु असे वटी।
कीं त्यासी तो उत्पाटी। निमिष्यमात्रें ॥ ९० ॥
महापूरु दाटे दोहीं थडी। शनै शनै देहाची खचे दरडी।
तेणें मुळें पडती उघडीं। तया द्रुमाचीं ॥ ९१ ॥
मग येकु लोटु ये थोरू। किं समूळीं उत्पाटे तरु।
त्यासी घेउनी जाए महापुरू। निमिष्यमात्रें ॥ ९२ ॥

---

१ श्रीज्ञानेश्वरींत व या ग्रंथांत ही ‘ ई ’ कारांत स्त्रीलिंगी शब्दाची द्वितीया अंत्य स्वराच्या ऱ्हस्वत्वांत दृग्गोचर होते. २ रुईचें झाड. ३ मिठि. पहाः—प्रियोत्तमाचां कंठीं । प्रमदा घे आंटी ॥ श्री. ज्ञा. १३×७८४. ४ ‘ वस्तिकर ’ असें पाठांतर. यावरून ‘ वस्तबांध ’ याचा अर्थ वस्ति करणारें असा च होतो.

तैसि सेवितां वनितागोडी । खचों लागे देहाची दरडी ।
तेणें आउष्याचीं मूळें उघडीं । पडतीं देखां ॥ ९३ ॥
तेथ तारुण्याचिये धारें[1] । उठिती लावण्याचे भवरे ।
भवों लागती विस्तारें । कटाक्षवळसे ॥ ९४ ॥
वनिता संनिधीची दाटी । ते दरडी जे गोमटी ।
क्षणमात्रें उत्पाटी । ने निरयाप्रती ॥ ९५ ॥
ऐसीये नदीं बुडाले । ते वाहात रौरव सागरीं मिळाले ।
न निघत चि वसिनले[2] । कल्पकोडी ॥ ९६ ॥
म्हणौनि नदीतटीचिया वृक्षा । आणि घराश्रमीचेया पूरुषा ।
मोक्षाची नाहीं आशा । रघुराया ॥ ९७ ॥
पुढां उभी कीजे हरणी । मृग तटस्थु होये देखोनि ।
तंव मारी मागिलीकडूनि । दीपव्याधु[3] ॥ ९८ ॥
तैसी उभी करूनियां स्वरूपु । दावी वनिताकुरंगीदीपु ।
काळु मारी अदृष्टरूपु । नरमृग ते ॥ ९९ ॥
ऐसी हे वनिता । कुंभीपाकासी मूळ गा रघुनाथा ।
सहस्रपरी विचारितां । सुष्ट नोहे ॥ १०० ॥
जेणें पळविला ईश्वरु । तो त्रिदशकंटकु[4] भस्मासुरु ।
तो वनितावेषें सारंगधरु । वधूनि आले ॥ १ ॥
स्त्रियेचे चाडे कारणें । नाठवे चि त्यासी मरणें ।
मस्तकीं हातु ठेऊनि तेणें । भस्म केला ॥ २ ॥
वनिताभ्रमें जो अल्पवे[5] । त्यासी मरण अधोगति हें नाठवे ।
तेथ सुखें वर्तती भावे[6] । चाडेस्तव ॥ ३ ॥

---

१ वाहाण, पाण्याची धार. २ राहिले. ३ रात्रींचे वेळीं शिकार करणें झाल्यास हरिणीची साउली पुढें दाखविली म्हणजे हरीण तटस्थ होतो व आयताच व्याधाचे तावडींत सांपडतो ४ देवांस कांट्याप्रमाणें खुपणारा. ५ बुडणें. पहा श्रीज्ञा. ११×३११ आप्लवणें; याचा लहान होणें, क्षुद्र होणें, असा हि अर्थ होईल. ६ पोथीच्या अक्षरांच्याच वळणानें ‘ भावे ’ हा समासांत जास्त शोध घातला आहे.

त्रैलोक्यराजा निश्चितु । सुरवंदनु निभ्रांतु[1] ।
तो इंद्रु जाला भगांकितु । स्त्रीनिमित्त ॥ ४ ॥
तदोपाधी[2] न लगता । तरि भगांकितु कां होता ।
वनिता विटंबी तत्वता । योगियांसी ॥ ५ ॥
तिची जालियां कटाक्षदृष्टी । तुरे चि तपस्ट्टी ।
या कारणें गिरिकपाटीं । वसती योगी ॥ ६ ॥
सेवावया वन । आणिक नाहीं कारण ।
स्वस्त करूनि अंतष्करणं । विचारीं रामा ॥ ७ ॥
आणिकें द्रव्यें[3] असती । ते सेविलेयां माजविती ।
वनिता भ्राम्यगती । दर्शनमात्रें ॥ ८ ॥
वनिता न ते द्रव्याचा राउ । किं कंदर्पसुखाचा आदिठाउ ।
जियेच्या लाठेपणाचा[4] आउ । तिहीं लोकीं ॥ ९ ॥
जेणें[5] समाधिस्तु हरु[6] चेष्टविला । पाराशरु भुलविला ।
विश्वामित्रु केला । प्रेमपिसा ॥ ११० ॥
जयाचे सकळ+ सुरवरां पवाडे । जारजां अंडजां उत्पत्ति घडे ।
महासतीयां भुलवणी पडे । तो चि जाणे ॥ ११ ॥
जयाचिया अणुमात्र धाडि । वैराग्य होये देशधडी ।
तयाची नांदणुक फुडी । वनिताग्रामीं ॥ १२ ॥
जैसे कौसुंभ द्रुमांचें प्रथमाग्र तुटे । कीं अधीक फुटती फाटे ।
तैसें वनितासंगें घटे* । कुकर्म ॥ १३ ॥
ऐसा जो मदनु । तापसां त्रासवि गहनु ।
जेणें चेष्टविला पंचाननु[6] । निमिषमात्रें ॥ १४ ॥

---

१ भ्रांतचित्त न होणारा. २ वनिता हीं च उपाधि तिला ( द्वितीया ). येथें उपाधि शब्द दीर्घ ईकारांत आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें रूप आहे. ३ केवळ ' मादक द्रव्यें ' असा येथें अर्थ आहे. ४ थोरपणा, मोठेपणा. ५ येथपासून कामाचें वर्णन आहे, वनितेचें नाहीं. ६ श्रीशंकर. + ' जयाचें सळ सुरवरां पठे ' हें पाठांतर. * ' घडे ' पाठांतर.

तो वनिता[1]पुरीं । नांदतुसे सर्व प्रकारीं ।
ह्मणौनि जेथ शंबरारी[2] । तो संगु त्यजावा ॥ १५ ॥
ऐसी ते प्रमदा । विषयात्मक सदा ।
नां ते अनंगकरीची गदा । वाजे त्र्यैलोक्यावरी ॥ १६ ॥
नां ते दुष्कृतलोहाचा आंकुडा । विश्वमीनांसी पडिला गाढा ।
वोढूनु घाली आगडां[3] । निरयडोहीं ॥ १७ ॥
ते कार्पण्यडोहींचा मीनु । शोकसमुद्रींचा मगरु गहनु ।
विषयदाढे मिठी देउनु । असे भूतांसी ॥ १८ ॥
ऐसा घराश्रमु सुखाचें निरशन । तुज सांगावेया तुं चि कारण ।
पुसत होतासि लक्षण । रामचंद्रा ॥ १९ ॥
तंव रामु ह्मणे गुरुराया । हा अपराधु केला मियां ।
या स्त्रीवेसनाचेया घाया । मि ह्मणौनु वांचला ॥ २० ॥
करित होतों संतांचिया गोष्टि । तेणें अंतष्कर्णा जाली संतुष्टि ।
कैंचि करूं गेलों गोष्टी । गृहाश्रमाची ॥ २१ ॥
हा अपराधु माझा स्वामि । स्त्रीसंसर्गु निरशितां श्रमलेति तुह्मी ।
परि बोलिलेति उतरी सवर्मी । तें पातलें मज ॥ २२ ॥
तुमचया वचनामृतवृष्टि । पडिली माझां कर्णपुटीं ।
मोहोजाळ तुटौनु सुष्टें वाटीं । लागलों स्वामि ॥ २३ ॥
तवं वसिष्ट ह्मणती राजीवलोचनां । हें समस्त आइकिलेंयां
तुझेया मना । काई आलें तें दशरथनंदना । सांघ पां मज ॥ २४ ॥
पुसतुसि जिया कुसरी । तुझीये मनींची भरोवरी[4] ।
जाणवैल मग पुढारी । सांगों बुद्धि ॥ २५ ॥
आतां निवृत्तिदासु ह्मणे । हें वसिष्ट रुषीचें बोलणें ।
यासी उपमां कवणें । कैं द्यावी ॥ २६ ॥
तो योगज्ञानीं श्रेष्ठ । सप्तरुषिंमाझि वरिष्ठ ।
ह्मणौनि लोकीं वासिष्ठ । ह्मणती यातें ॥ २७ ॥

---

१ ग्राम, शहर. २ मदन. ३ धसफसीनें, बळजबरीनें. ४ आवड.

जेयांचें तेज आकाशीं । जो उत्कर्षु तपासी ।
ह्मणौनु तो उपदेशी । रामचंद्रातें ॥ २८ ॥
ते आइकौनु संस्कृत वाणी ।
मि मऱ्हाटी बोलिलां आगळा ना उणि ।
हा स्त्रीविषादु कवण्हीं । न बोलती चि ॥ २९ ॥
योगशास्त्रकर्ता येकु । जया नांव वृद्ध काश्यपु ।
दुसरा योगी याज्ञवल्क्यु । भगवानु तिसरा ॥ १३० ॥
हे न बोलतीच दर्शनांचा संवादु । न संगती चि युगधर्मभेदु ।
नोबलती गृहस्तधर्मनिषेदु । अणुमात्र ॥ ३१ ॥
अनुभवाधार बोलणें । वेदा सिद्धांता अनुसरणें ।
किंबहुना शिष्यु उपदेशणें । वसिष्ठें चि ॥ ३२ ॥
श्रीरामु परब्रह्ममूर्तु । अज्ञानें झांकोळला असे पुसतु ।
हें परिसलेयां उधरतु । महामूर्ख ॥ ३३ ॥
आणिक येक विशेष लक्षणें । संस्कृतासी जालें मऱ्हाटें लेणें ।
ग्रंथु चि गुरू ऐसें बोलणें । म्यां बोलियलें ॥ ३४ ॥
वसिष्ठु पवित्रां राउ । देखोनु रामचंद्राचा भाउ ।
कोठेंहि गुंपे ऐसा ठाउ । नोबलेची ॥ ३५ ॥
तैसेंचि निवृत्तिकृपाप्रभावें । म्यांहि बोलिलें बरवें ।
आपुलें आपण न सांगावें । ज्ञानदेउ ह्मणे ॥ ३६ ॥
गृहस्ताश्रमु निषेदिला वसिष्ठरुषि ।
तो आईकिलेंयां जो अध्यात्म अभ्यासी ।
तिहीं त्यजिलें परि विशेषिं । कामिकींहीं ॥ ३७ ॥
अध्यात्मियांचा मुख्य आरंभु । त्यजिजे स्त्री किजे संतसंगु ।
अनृत आणि दंभु । दूरि सांडिजे ॥ ३८ ॥
शनैः शनैः प्राणायामु साधिजे । क्रोधु अहंकारु दंभु त्यजिजे ।
निशेष मारिजे । पहिलें मन ॥ ३९ ॥
या कारणें वडिलीं बोलिलें । जिहीं गृहस्तीं वासिष्ठ देखिलें ।
ते सांडूनि गेले । सुंदरा वनितातें ॥ १४० ॥

तंव गुरु ह्मणती आइकिलें। संस्कृत लोकांसी न कळे वहिलें।
तुवां मऱ्हाटिये करुनी सांडविले। विषयसंग ॥ ४१ ॥
तुज पुण्य जोडलें कोटि। कीर्ति जाली सृष्टि।
वासिष्ठ केला मऱ्हाटि। विश्व उद्धरावेया ॥ ४२ ॥
न करवे ग्रंथाचा अर्थु। परि तुझा मतिप्रकाशु अद्भुतु।
योगु असे स्वानुभूतु। मग चि फावलें ॥ ४३ ॥

ॐतत्सदिति श्रीयोगवासिष्ठे। वसिष्ठरामसंवादे। गृहस्ताश्रमनिषेधु नाम षष्टमोध्यायः ॥ ६ ॥

---

## ॥ अध्याय सातवा ॥

श्रीपरमात्मनेनमः।

हें असो बोले श्लोकार्थु[1]। रामा वसिष्ठाचा येकांतु।
श्रीरामु काई असे पुसतु। तें सांग पुत्रा ॥ १ ॥
जी ह्मणौनि ज्ञानदेवें। आनंदपूर्ण मनोभावें।
अनुज्ञावचन होआवें। मज स्वामि ॥ २ ॥
बी जळाची जवळीक लाहे। तें चि शाखोपशाखीं होये।
ऐसें गुरुवचन आहे[2]। सर्व सुफळ ॥ ३ ॥
तवं रामु ह्मणे कृपावशें। हे अष्टांगयोग कैसे।
परिसावेया जीवीं असे। आर्त थोर ॥ ४ ॥
बापु पुसतांये योगि। ढांडुळा घेतसे सर्वमार्गीं।
ऐसा खडतरू तो चि योगी। अधिकारी[3] ॥ ५ ॥

---

१ वसिष्ठाचा ग्रन्थ. २ पहा श्री ज्ञानेश्वरी ९X१०८. बीज जलाची जवळीक लाहे। तें चि शाखोपशाखीं होये ॥. ३ हे रामा मार्गामार्गांचा झाडा तूं विचारून घेतोस, तेव्हां योगशास्त्रीं तूं च अधिकारी आहेस, हा भावार्थ.

रामां येक असती ध्यानस्त । येक विसरले तटस्त ।
एकीं देखिलें समस्त । आत्मरूप ॥ ६ ॥
येक संसारत्यागिये । येक येकाकी निसंगिये ।
येक विरक्त योगिये । दिगंबर ॥ ७ ॥
येक बाळे भोळे पिंसाट । येक विकट वितंड सुनाट ।
रजें रुळले रेणाटं[1] । तेहि योगी ॥ ८ ॥
ऐसे हे खेचर भूचर । अवधूत योगीश्वर ।
यांचें अष्टांगयोग विवरें[2] । पारेयसैं रामां ॥ ९ ॥
येम नियम प्राणायाम । ध्यान प्रत्याहारु धारण ।
समाधी सिद्धासन । यें आठे अंगें ॥ १० ॥
कर्मयोगु तो पवनें । हटयोगु तो मनें ।
ध्यानें लयो ज्ञानें । राजयोगु[3] ॥ ११ ॥
कर्मयोगीं पवनु जारिजे[4] । हटयोगें मनु मारिजे ।
लययोगीं गगन हारिजे[5] । विचारिजे[6] राजयोगें ॥ १२ ॥
या अष्टांग वेवस्ता । तुज सांगों रघुनाथा ।
करुनी येकाग्र चित्ता । परिस बापा ॥ १३ ॥
यम नियम तो कर्मयोगु । प्राण प्रत्याहारु तो हटयोगु ।
धारणां ध्यान लययोगु । राजयोगु येरें दोन्हीं ॥ १४ ॥
तरि अगा हेमनँ[7] । किजे देह दमन ।
अनार्सनी[8] गमन । तिर्थां देवां ॥ १५ ॥

---

१ रेणूंनीं भरलेला तो रेणाट घाम-घामट; पिसें-पिसाट; सुणें-सुनाट (कुत्र्यासारिखें); २ विवरण. श्रीदास. १४×३×४६. ३ योग चारः-कर्म-हट-लय-राजयोग. यांचीं साधनें हि चारः-पवन-मन-ध्यान-ज्ञान. यांत मन पवन एक असल्यानें कर्म-हट योग एक च होत. ४ या शब्दाचा अर्थ बहुधा 'शुद्ध करणें' असा असेल. ५ लय करणें. ६ राजयोगी नेहमीं केवळसमाधींत असल्यानें त्यांस कांहीं 'सांडणें मांडणें' नाहीं; फक्त 'असणें' आहे. ७ 'यमन' हें पाठांतर. या पुढील १५-२४ ओवींनीं 'यमा' चें वर्णन केलें आहे, तेव्हां 'येमन' हा पाठ घेतल्यास हरकत नाहीं. हे-मन हा शब्द समान उच्चार आहे. ८ परवाणावांचून, पायां.

किजे भूतशुश्रुषा । मारिजे ताहान भूक ।
आपुलेनि आंगें सुख । किजे जगा ॥ १६ ॥
पडिलेयां प्राणियां धावे । अडलियां अवघडिया पावे ।
उभा ठाके जीवें । भूतहितीं ॥ १७ ॥
जो गाई ब्राह्मणां आडवीं । संकष्टीं आंग वोडवी ।
आकांतीं सोडवी । प्राणियांसी ॥ १८ ॥
सडे रंगमाळिका प्रसादीं[1] । मोडलीं कीर्तनें सांदी ।
सांडोवा[2] करी नदि । तळीं उपसे ॥ १९ ॥
तिर्थे करीं चोखटें । बांधे सरिताघाट ।
सोपान करी वाट । कांटा हरळु ॥ २० ॥
गोठणें करी समतळे[3] । जळें करी निर्मळें ।
जो पाहे[4] सकळें । वृंदावनें ॥ २१ ॥
जोपा करी वृक्षां । पव्हे घाली पक्षां ।
जाणितली विद्या शिष्यां । उपदेशी ॥ २२ ॥
पूजा करी पुष्पें पत्रें । उजळी मैळलीं शास्त्रें ।
अनेकें रचुनी स्तोत्रें । ब्राह्मणां दे ॥ २३ ॥
अवघडीं अक्षमांते चालवी । वियोगस्तांते[5] मेळवी ।
येमयोगलक्षणीची बरवी । स्थिति हे ॥ २४ ॥
आतां नियेमु निष्कर्मनिष्ठा । पैजा प्रतिज्ञा प्रतिष्ठा ।
तै कीजे प्रविष्टा । कीर्तनांसी ॥ २५ ॥
जिये दर्शनीं जो धर्मु । जिये आश्रमीं जो कर्मु[6] ।
कुळकर्मधर्मु । तो चि कीजे ॥ २६ ॥
जिये काळीं जें कर्मांतर । तें विधि गौरवें आचरे निरंतर ।
अर्थे प्राणें अंतर । नेदी भूतां ॥ २७ ॥




---

१ प्रसाद=देऊळ. २ नदीचे भरतीचें पाणी ज्यांत अडविलें आहे अशी जागा. ३ समांतर आहे तळवट ज्याचें असें गोठाण. ४ जोपाहे=राखणें, जोपा करणें. ५ ज्यांचा वियोग झाला आहे अशांस. ६ ‘ क्रमु ’.

जप होम हवनें । अंनछत्रें उद्यापनें ।
मंत्र जाप्य स्तवनें । प्रिय पूज्य[1] ॥ २८ ॥
[2]उसे वाणें व्रतें । उपोषणें अयाचितें[3] ।
प्रदक्षिणा दंडवतें । ब्रह्मचर्य ॥ २९ ॥
कहिं न ठेके[4] स्वाहा स्वधा । यांचकांसी न भंगे कदा ।
सत्य राहाटे सदा । न्यायेंपथें ॥ ३० ॥
शरणागत राखिजे । निराश्रय पोखिजे ।
याचकांसी देखिजे । लिंगं जैसें ॥ ३१ ॥
कां स्वामिकाजीं रणीं पडिजे । भगती[6] सहगमन कीजे ।
कां वैराग्यें जाईजे । महापंथें ॥ ३२ ॥
वर वेचों अर्थप्राणें । परि न टके वेळेचें करणें ।
ऐसें जाणोनु जीवें जिणें । ते नियम गा ॥ ३३ ॥
आतां प्राणायामु सांगेन कैसा । सविस्तर परियसा ।
उत्तमु मध्यमु यैसा । भेदु नाहिं ॥ ३४ ॥
नाहिं भिन्न भेदु । न करी भूतविरोधु ।
कवण्हां प्राणियां खेदु । उपजवीना ॥ ३५ ॥
सकळ क्रिया कर्म । सम देव धर्म ।
सकळ शास्त्रीं वर्म । येक चि देखे ॥ ३६ ॥
सकळ भूतीं समान । विश्वासीं करी नमनें ।
जीवजाति भजन । कृपाळुपणें ॥ ३७ ॥

---

१ पूजा ज्यास प्रिय आहे असा ? २ वोवसें वाण, वायन. ३ आमंत्रण नसतां व इषारा हि न देतां अवाचित् वाढलेल्या पात्रांवर जाऊन बसण्याचा एक प्रघात आहे. ' अविचत् मंगळवार–शनिवार ' असें व्रत कित्येक करतात तें. ४ बंद पडणें. ५ शिवलिंगाप्रमाणें याचक पूज्य मानावा. दान करणें तें दुश्चित्त मनानें करूं नये. आपण कोणी मोठे व दान घेणार क्षुद्र या भावनेनें दिलेलें किंवा त्रासानें दिलेलें, किंवा कीर्तिसाठीं दिलेलें, किंवा अवमान करून दिलेलें, हें दान नव्हे. आनंदानें व आपल्यावर हा प्रसाद आहे अशा भावनेनें दिलेलें खरें दान होय. ६ भक्तीनें. ७ पैसा व प्राण गेलेला पुरवला परंतु–. ८ 'कर्माचा वेळु चुके' हें अज्ञान; पहा श्री ज्ञा.१३.६८०.९ पहा श्री ज्ञा.-सकल भूतिं । नमूं चि आवडे ॥

नियेमाथे चालिजे । सत्य शौच्य बोलिजे ।
विचारें वोळखिजे । ते व्रती गा ॥ ३८ ॥
न करी परद्रव्याची आस । न संडी सत्य भाष ।
दुखवला परि असत्य । कहिं न बोले ॥ ३९ ॥
पुढिलातें वानी । न्यूनातें मानी ।
पैशून्यातें कानीं । आइकेचि ना ॥ ४० ॥
कोण्हें हि रजे[1] न मजे[2] । कुटी कुपरी[3] लाजे ।
केलें अनुवादिजे । आर्थीचि नाँ ॥ ४१ ॥
आळुंकी न करी कदा । शौच्य बोले सदा ।
वर्तें तें चि पदा । ईंद्रतुल्य ॥ ४२ ॥
मग करी प्राणु पूरकु । अपानें ले कुंभकु ।
ऐसा जो अभ्यासकु । तें प्राणायाम अंग ॥ ४३ ॥
आतां प्रत्याहार वेवस्ता । सांघेन परिस रघुनाथा ।
करूनि येकाग्र चित्ता । मनोभावें ॥ ४४ ॥
आधि मारिजे मायामोहो । जारिजे विरहो ।
मग सांडिजे रोहों । गगनग्रासी ॥ ४५ ॥
काम क्रोधु मारिजे । अहंकारु जारिजे ।
मदु मछरु हरिजे । ज्ञानखगें ॥ ४६ ॥
मनमूळ उन्मूळिलें । इंद्रियाचे डोहळे मोडिलें ।
पवनांचे नि मेळें । भस्म केलें ॥ ४७ ॥
उठिली विरंगति । तिया गिळी वृंति ।
शांति अहंमति । विधूंसिली[10] ॥ ४८ ॥

---

१ राजस प्राप्तीनें ( द्रव्यादि ). आणि स्त्रीपुत्रादि मेलें । संपति जवं फले । तेणें रजें डोले । जाति जेयाचे ॥ श्री ज्ञा. १३+७६७. २ न माजे. ३ कुटी= आळ, कुपरी वाईटवान–कुसंगति. ४ झांकी निफनलें'= 'जें केलें त्याचा उच्चार ही नाहीं; हें ज्ञानाचें लक्षण; अज्ञानाचें–' घाली विद्येचा पसार । सुये सुकृताचा डांगोरा । करी तेतुलें मोहरा । स्फीतीचेया ॥ ' श्रीज्ञा १३×६५८. ५ आवड, भूक. ६ ज्या स्थितींत आहे तिच्यांत च संतोष. ७ ' वृद्धि ' पण येथें तिचा काय संबंध ? ८ विरक्ति; ९ वृत्ति. १० ' विध्वौंसिलि ' याचें समोच्चाररूप ' अशीं रूपें श्री ज्ञानेश्वरींत येतात जसें बव्हे–बहे, सर्वैः–सर्वीं.

महासंधी मोहिजे । विषमसंधि दोहिजे ।
सर्वसंधी होईजे । राहिजे हंसवाहें ॥ ४९ ॥
तैं अखाद्य तें खाइजे । असेव्य तें सेविजे ।
अपेय तें पीजे । जीजे येणें कर्में ॥ ५० ॥
येक आहारिती कंदमूळें । येक प्राशिती जळें ।
येक सेविती अनिळें । हें प्रत्याहारांग ॥ ५१ ॥
पांचवे अंग धारणा । रामु पूसतुसे आपण ।
कोण्हि युगीं कष्ट कवण । तें पाहावेया ॥ ५२ ॥
तरि पुरकु भानु धरिजे । झरतु शशि भरिजे ।
हंसु स्छिरु कीजे । कुंभकरूपें ॥ ५३ ॥
टाळीं पडिलीं श्रोत्रीं । कपाटें लागलीं नेत्रीं ।
वाहो राहिलीं सूत्रीं । घ्राणगति कुंठली ॥ ५४ ॥
विचरत वारिले चरण । न करि कराचें चळन ।
अधोद्वारीं धरण । मोहन[1] वाचे ॥ ५५ ॥
बाहिरिलें बाहिरी चि धरी । भितरिलें भितरी चि भरी ।
चोविस ह्यापरि । तत्वें भेदी ॥ ५६ ॥
तैं तमोगुणु खांचिजे । रजोगुणु वंचिजे ।
सत्वगुणु खोचिजे । नीटु पाहिं ॥ ५७ ॥
शिवशक्तीचां समत्वा । रविशशीचेया येकत्वा ।
मूसे आटे तें तत्वतां । तत्व ह्मणिजे ॥ ५८ ॥
फुरे नां फुंदे । वदे नां वंदे ।
यापरि नांदे । तें धारणांग ॥ ५९ ॥
आतां ध्यानांगें सांगों कैसी । रितुनारि रमे अनायासिं ।
आंगिला असे मानसी । जेवि दंभें ॥ ६० ॥
जैसा आत्मजाचा मोहो । नांतरि कामिकाचा विरहो ।
या सारिखा रोहो । असे ध्यानीं ॥ ६१ ॥

१ मौन.

नातरि पाणीहरिये[1] शिरीं । डूडी भरलीया घागरी ।
अवेवीं राहाटे व्यापारीं । परि चित्त कलशीं ॥ ६२ ॥
धनुर्विद्येचें अवधान । अवेवीं साधीति संधान ।
लक्षीं बैसले लोचन । ध्यान तैसें ॥ ६३ ॥
ना तरि चेंडू चक्रें चाळिती । रागांगें गायनें आळविती ।
पांई घागरिया वाजती । परि लयीं चित्त ॥ ६४ ॥
अनेगां अभरणांसी । वारतियांवरि चाले अकाशीं ।
परि सूत्र वाहे मानसिं । ध्यानीं तैसें ॥ ६५ ॥
नातरि चकोरु बैसोनु मेदिनीं । ध्यान लावी गगनीं ।
योगिया विचरे जनीं । परि मनीं तत्व ॥ ६६ ॥
नां तरि तारूं भरलें समुद्रीं । ध्रूमंडळीं ठेविली बुद्धि ।
या सारिखी सिद्धि । ध्यानीं असे ॥ ६७ ॥
तैसा वेव्हारीं वर्ते जाग्रति । योगिया खेळे सर्वत्री ।
परि त्याचां मनीं पवनमात्रीं । ध्यान वर्ते ॥ ६८ ॥
तें ज्ञान फुरे ऐसें । रत्नगर्भीं कीळ जैसें ।
अष्टोपाहार प्रकाशे । उदित तें ॥ ६९ ॥
जैसा कर्पुरा अंगीं गंधु । कां कळिकागर्भीं मकरंदु ।
तया सारिखा कंदु । आसनांगीं ॥ ७० ॥
गंगेचां आंगीं गुणु । उदकासवें चि पवित्रपण ।
आसनांगींचें लक्षण । या सारिखें ॥ ७१ ॥
तो बोले तितुकें स्तवन । भोजन करी तें हवन ।
निद्रा करी तें ध्यान । गमन ते प्रदक्षिणां ॥ ७२ ॥
तो चाले ते यात्रा । जेथ असे तें क्षेत्र ।
बैसे तें पवित्र । तीर्थ जाणें ॥ ७३ ॥
तयां पुढां चालतीं तीर्थें । खेळतीं देवतें ।
आणिकें हि पाठोवाटि काढतें । ऐसें आसनांग ॥ ७४ ॥

---

१ पाणीहर=पाणी आणणारे.

जिउतिया फुरती बुद्धि । तिउतिया रिद्धि सिद्धि ।
ते कामनां विशुद्धि । वरि बैसला[1] ॥ ७५ ॥
आतां सांगौ समाधी । जे भवबंधनातें छेदी ।
जेणें होइजे व्याधि । गर्भवासांचिये ॥ ७६ ॥
जें विश्वरूपें अळंकारें । मुसे आटलीं भांगारें ।
तेविं लपालीं साकारें । शून्य जालीं ॥ ७७ ॥
धेनु नानाविधा । जेवि मिसळलें न निवडे दूध ।
तें अद्वैतांसि त्रिशुध । मिळौनि गेलें ॥ ७८ ॥
नां तरि नवनीत । क्रमें निजपलें घ्रुत ।
तेवि समाधि चित्त । सिद्ध जाले ॥ ७९ ॥
नां तरि भ्रुंगीतें ध्यातां । कीटकी पातली सायुज्यता ।
तेवि समाधिस्थिता । मुक्ति सिद्ध ॥ ८० ॥
ना तरि काष्टमथनीं मेळु । स्वरूपीं अवतरे अनिळु ।
तैसा समाधीचा खेळु । स्वयंसिद्ध ॥ ८१ ॥
कां उदकीं पडिलें काश्मीर । असणें चि परि निराकार ।
तेंवि लपालें साकार । शून्यवृत्ति ॥ ८२ ॥
नांतरि कापुराची काजळी । घेउनी गेली पांजळी[2] ।
तैसी समाधी केवळी । चित्तवृत्ति ॥ ८३ ॥
नांतरि उदक लोहींवन्ही[3] । संयोगीं हारपलीं दोन्हीं ।
तेवि जिराले गगनीं । उभय पक्ष ॥ ८४ ॥
असें किं नाहिं । हे नेणिजे कहीं ।
हा संशयो चि पाहिं । मिळोनि गेला ॥ ८५ ॥
जैसें जाग्रतअवस्ते । चित्त सुखाप्रति वेर्ते ।
समाधि वर्तें । तुर्यैसी[4] ॥ ८६ ॥

---

१ हें श्रीअनुभवामृतांतील 'जीवन्मुक्ति प्रकरण' याशीं ताडून पहावें. २ पांजळी=दीपशिखा, ज्योति. हा च अर्थ 'प्रांजळी' चा आहे. प्रांजळ–अभिव्यक्त, स्पष्ट. (पाठांतर) ३ तापलेल्या लोखंडावर ४ 'चित्त सुषुप्तिं वर्ते' असें पाठांतर.

हें समाधी लक्षण । अष्टांग योगाविवरण ।
रामां आइके कष्टेंवीण । साध्य नाहिं ॥ ८७ ॥
हें स्थिति अष्टांगयोगीं ।
साधावेया आउष्य नाहिं कलियुगीं ।
पहिलीं पांच सांडूनि येरें तिन्ही भोगिं । तो साधकु गा ॥
तवं रामु ह्मणे ताता । अष्टांग योगु साधितां ।
मनासी नव्हेल निश्चळता । ऐसें जाणवतसे ॥ ८९ ॥
तंव रुषि ह्मणे अवधारिलें । रामां जें तुवां पूसिलें ।
तें आह्मां मानलें । तुझे मनोभाव ॥ ९० ॥
दैव करूनि फाडोवाडे । घेईजे खरें सांडिजे कुडें ।
ऐसें पुसतां फुडें । तत्व लाभे ॥ ९१ ॥
ज्ञानदेॐ ह्मणे कृतार्थु । कैसा अध्यात्मीं निश्चितु ।
यासी साधितां परमार्थु । क्षणु नलगे ॥ ९२ ॥

ॐ तत्सदिती श्री योगवासिष्ठे । वसिष्ठ रामसंवादे । अष्टांग योग विवरणं नाम सप्तमोध्यायः ॥ ७ ॥

## ॥ अध्याय आठवा ॥

### श्रीपरमात्मनेनमः ।

रामु पुसे वसिष्ठाप्रति । सर्बांतरात्मयांची कैसी स्थिति ।
तों सांपडे ते युक्ति । दोन्हीं सांगा ॥ १ ॥
तेथ गुरु सिष्या प्रति । स्वरूप निर्धारु सांगती ।
ते ॐवीप्रबंधें युक्ति । अनुवादेंन ॥ २ ॥
तरि परियसें आत्मां अभेदु । अछेद्यु व्यापकु सच्चिदानंदु ।
अंतर्यामी नित्यानंदु । स्वप्रकाशु ॥ ३ ॥

---

१ पुष्कळ.

आत्मा विश्वव्यापकु । अभासमय ग्रासकु ।
मशकु धरूनि प्रकाशकु । तो चि येकु ॥ ४ ॥
ऐसा तो आत्मनाथु । सर्व जीव व्यापितु ।
मायाभ्रांति विवर्जितु । आपण चि तो ॥ ५ ॥
त्यासी वर्णु नां व्यक्ति । अवेव नां स्थिति ।
ऐसी जे मूर्ति । ते कोणे लक्षावी ॥ ६ ॥
ज्यासी अंतु नां आदि मध्यु । नाहिं करचरणसमंधु ।
नावं गोत्र हा भेदु । बोलों चि नये ॥ ७ ॥
ज्यासी जाति नां रूपु । नव्हे पूरुषु नां स्त्री स्वरूपु ।
नपुंसकु ऐसा संकल्पु । करूं नै ये ॥ ८ ॥
ज्यासी आकारु नां वर्णु । नाहिं कर चरणु ।
नामगोत्रजातिवर्णु । आथिचि नां ॥ ९ ॥
ज्यासीजन्म नां मरण । नांहिं शस्त्रें छेदन ।
अग्नि नव्हे दहन । पाणि ना प्लवे ॥ १० ॥
जो व्यक्तु नां अव्यक्तु । द्वैत नां अद्वैतु ।
भाउ ना भ्रांतु । येक हि नव्हे ॥ ११ ॥
कळा नां ज्योती । शून्य नां निराळंब स्थिति ।
अमूर्तु नां मूर्ति । आत्मा तो ॥ १२ ॥
तो निर्गुणु नां गुणवंतु । संतु नां असंतु ।
सकळ सृष्ट्याचार अलिप्तु । परमात्मा तो ॥ १३ ॥
जो बाहिजु नां भीतरीं । जवळां नां दूरि ।
सर्व निरंतरि । आपण चि तो ॥ १४ ॥
ज्यांसी कुळ नां क्रमु । पाप नां धर्मु ।
जन्म नां अजन्मु । तो चि तो पैं ॥ १५ ॥
तो सूक्ष्मु नां स्थुळु । शून्य नां मायाजाळ ।
व्यापित सकळ । आपण तो ॥ १६ ॥

ऐसा तो आत्मनाथु । चतुर्दशभुवन व्यापितु ।
पापपुण्यविरहितु । अद्वय परमतत्व ॥ १७ ॥
तो अमूर्तु । देह विदेह विवर्जितु ।
अलक्षासी अतीतु । वेगळा तो ॥ १८ ॥
देहासी उत्पत्ति प्रळयो होये । परि तो येनां जाये ।
स्वयंसुख अद्वय असतूं चि आहे । अजु अव्ययो ॥ १९ ॥
हें प्रपंचमठ[1] विस्तारलें । सहस्त्रवेळु दहन जालें ।
तरि सांग पां काइ दहलें । महदाकाश ॥ २० ॥
तैसा आत्मां प्रकाशे । सर्वभूतीं असे ।
देह प्रपंचु नाशे । तो नित्यु ॥ २१ ॥
जेणें घटु घडिला । तो काई आकाश घालुनु भागला ।
नांतरी घटु नाशला । आकाश कुटकें[2] होए ॥ २२ ॥
घट घडे नशे । आकाश नित्य असे ।
तैसें शरीर जात येतसें । आत्मा नित्यु ॥ २३ ॥
उदकामाझि चंद्रु देखिला । तो काई उदकें लिंपला ।
तैसा आत्मा कर्मा वेगळा । कर्में केवि लिंपे ॥ २४ ॥
आपुलें प्रतबिंब अवेव । दर्पणीं दिसे स्वयमेव ।
तें मिथ्याभास अवेव । आपण वेगळा ॥ २५ ॥
नाममात्र भांडें । पृथ्वी येक चि फुडें ।
तैसीं देहें आनानें उदंडें । परि आत्मा येकु ॥ २६ ॥
नां तरि विविधें वस्त्रें । परि सूत चि असे निरंतरें ।
तैसीं देहें होतीं अपारें । परि आत्मा येकु ॥ २७ ॥
कीं नाम मात्रे भूषणें । निर्धारें येक चि सोनें ।
तैसीं देहमात्र विविध जाणणें । परि येक चि[3] ॥ २८ ॥

---

१ 'पट' पाठांतर. २ तुकडे. ३ 'आत्मा' हें अध्याहृत किंवा 'जाणणें' याचा अर्थ 'ज्ञान' ह्मणजे संवित् असा घेतला तर देह भिन्न परंतु ज्ञानस्वरूपी आत्मा एक, असा ही अर्थ होईल.

धेनु होति अनेगवर्ण । परि क्षीर येक वर्ण ।
तैंसी देह अनेगें जाण । आत्मा येकु ॥ २९ ॥
सरिता कूप बावी अनंता । परि तोय येक चि निर्धारितां ।
तैंसी देहीं भिन्नता । आत्मा येकु ॥ ३० ॥
अग्नि विविधाकारें । दीपरूपें अपारें ।
परि अग्नि येकू निर्धारें । तैसा आत्मा जाण ॥ ३१ ॥
घटमठादि आकारें । आकाश भिन्नत्वें स्फुरे ।
घटु भंगलियां निर्धारें । आकाश नित्य ॥ ३२ ॥
तैसा नानादेहीं जीवाकारें । आत्मा येकु चि निर्धारें ।
परिपूर्ण असिजे जेवि अंबरें । तेयापरी ॥ ३३ ॥
तवं ह्मणे रघुनाथु । हा आंतुडे कवणा कर्मातु ।
मिळुनु राहिजे यांतु । विघडीजे नां ॥ ३४ ॥
वसिष्ठ ह्मणे पवित्रमूर्ति । हा आंतुडे पवनाभ्यासयुक्ति ।
समाधिस्छां होउनु येकांति । भोगिजे ॥ ३५ ॥
आणिकिं बहुवसा युक्ति । समस्त सांगितलीया तुजप्रति ।
ते अवघी भ्रांति । निरसिली तुझि ॥ ३६ ॥
आगा जाळ जळीं पांगिलें । तेथ चंद्रबिंब दिसे आंतुडलें ।
थडिये काढूनि झाडिलें । बिंब तें कैचें ॥ ३७ ॥
स्वप्नीं राज्य भोगिजे । ते चेइलेयां जरि देखिजे ।
पाहे पां मृगजळें होईजे । त्रुप्ता काई ॥ ३८ ॥
देखौनु गंधर्वनगरींचे वारु । जो नरु ह्मणे राज्य धरुं ।
नां तरि चित्रीं लिहिला परिवारु ।
तेणें राज्यभारु चालों पाहे ॥ ३९ ॥
जैसें हें समस्त वाऊ । तैसा एरा आवघेयाचा अभिप्राऊ ।
अध्यात्मेविण सकळै वाऊ । निरुतें[3] जाण ॥ ४० ॥

---

१ ही सबंध ओवी श्रीज्ञानेश्वरी अ. ९×१३७ व्यातील ओवी बरहुकुम आहे.
२ बहुवचन [ ? ] ३ सत्यतेनें.

जैसि कापुराची सेंदरि ती । असे परिमळें न संडिति ।
तैसि योगस्थिति । कांहि असे ॥ ४१ ॥

ॐ तत्सदिति श्री योगवासिष्ठे । वसिष्ठरामसंवादे । सर्वांतरात्मप्रशंसा नाम अष्टमोध्यायः ॥ ८ ॥

## ॥ अध्याय नववा ॥

श्रीपरमात्मनेनमः ।

नमन श्रोतयां श्रेष्ठां । जे जाणती पुढिलाचेयां कष्टां ।
मऱ्हाटी करितां योगवासिष्ठा । थोर दुर्गम ॥ १ ॥
मेळवावा ऱ्वीचा प्रांशु । पडों नेदावा संस्कृतीं भ्रंशु ।
दुष्ट पाहाति डंसु । उणें पुरें ॥ २ ॥
उपमा बोलावी निगुति । जैसी मिळे युक्ति ।
अध्यात्मवेत्ते ह्मणती । हे चि घडे ॥ ३ ॥
परि आधी तंवं मज पुसा ।
अध्यात्म या शब्दाचा अर्थु कैसा ।
हे श्रीगुरु निवृत्ति सांगति तैसा । अन्यथा न कळे ॥ ४ ॥
ज्यासी आत्मा अधीनु । तो कळेवर सांडुनु ।
जाये ईंद्रसभे आंतुनु । मागुता ये ॥ ५ ॥
हें ईये युगीचें नव्हे साधन । या युगांतु नूठी आसन ।
आतां येक चि घडे ध्यान । लाविजे कष्टीं ॥ ६ ॥
हा पवनाभ्यासु अभिप्राॐ । अनुवादैल वासिष्ठ गुरुराॐ ।
तें सांघैल ज्ञानदेॐ । निवृत्तीचा ॥ ७ ॥
गुरूतें सिष्यु पुसे । हे रचना समस्त असे ।
ते तुह्मि कथिजे कृपावशें । सद्गुरुराया ॥ ८ ॥

जैसा करितु आलासी विस्तारु । तैसा चि करी संहारु ।
तरि रचनेचा विचारु । आईक पृथग्विध ॥ ९ ॥
नागराचां चासीं । सर्पु वीतु जाये पिलीयांसीं ।
पुनरपि परतौनु ग्रासी । आवघी चि पैं ॥ १० ॥
तैसा आपण चि रचने आला । पुनरपि ग्रासुनु निगाला ।
तो गुरुपुत्रु भला । ओळख तुं ॥ ११ ॥
तैसें करणें करिसी । तरि आमतें एसैं निर्धारेंसी ।
रचना समस्त निरसी । तो चि निका ॥ १२ ॥
आतां सांगैन कथन । तरि येकाग्र करीं मन ।
सर्व जीवां मोक्षसाधन । येणें ज्ञानें ॥ १३ ॥
हें कथन कथिलें अगोचरमूर्ति । प्रथम आदिनाथाप्रति ।
तिहीं सांगितली हे ज्ञानास्थिति । निरंजननाथा ॥ १४ ॥
तेथुनि विस्तारलें । तेणें अनंत उधरले ।
तें चि ज्ञान आलें । आमुचेया ठाया ॥ १५ ॥
तें ज्ञान तुजप्रति । कथन करीन गा रघुपति ।
अशेष निरसौनि चित्तीं । दृढ धरीं ॥ १६ ॥
ऐसे वसिष्ठऋषि बोलिले । मग योगतत्व वाखाणुं आदरिलें ।
मुक्तार्थें कथन केलें । सिष्याप्रति ॥ १७ ॥
तरी रचनादि दाहा देहें असती ।
येक येकासी त्रय त्रय नाम्नां बोलिजती ।
ते रचनां तुजप्रति । सांगों आतां ॥ १८ ॥
तरि प्रथम परवस्तुपासूनु । जाला लयेनु ।
लयनापासुनी गहनु । कृतिपकु पैं ॥ १९ ॥
कृतिपकापासौनी सप्तेशु । सप्तेशा पासौनी आर्या निर्देशु ।
तेथुनु जाला प्रकाशु । जोतिसांख्यु ॥ २० ॥
सांख्या पासौनु कैसा । केवळ अंकारिया परियेसा ।
समरु जाला जैसा । सांख्य सदृशु ॥ २१ ॥

समरी पासौनु गुणक्रतु जाला । गुणक्रुतें क्रुतिवासा रचिला ।
तेया पासौनु उपेंद्रु जन्मला । उपेंद्रें रचिला निद्राहीनु ॥२२॥
निद्राहीनें रचिलें पिंड ब्रह्मांड । चतुर्विध भूतग्राम प्रचंड ।
सप्तद्वीपावती नवखंड । पृथ्वी पर्वत ॥ २३ ॥
ऐसी रचनां अशेषी । आली अनुक्रमें विशेषीं ।
हें समस्त जाणौनु श्रीगुरुमुखीं । ज्ञाते ग्रासु करिती ॥ २४ ॥
अंतष्करण पंचक । समरु धरुनि निशेष ।
सांघैन तें आईक । सिष्यराजा ॥ २५ ॥
तरि पंचभूतां माझारि निर्धारु । येक येकाचा पंचधा प्रकारु ।
परस्परें मिनला तो विवरु । परिस बापा ॥ २६ ॥
पृथ्वीचे पांचगुण । अहंकारु अपानु घ्राण ।
वायु गंधु जाण । निर्धारेंसीं ॥ २७ ॥
तरि प्रथम अकाशीं । अहंकारु दिधला तयासी ।
येणें रूपें परियसें । पृथ्वि मिनली ॥ २८ ॥
दुसरें वायूचां ठाई । अपानरूपें मिनलीं पाहिं ।
तेजीं मीनली तो ही । घ्राणरूपें ॥ २९ ॥
वायुरूपें आपीं । गंधु आपुला चि स्वरूपीं ।
पंचधा विभागु निक्षेपीं । पृथ्वि मिनली ॥ ३० ॥
आपाचे पांच गुण । चित्त प्राणु रसनां शिस्न ।
रस हे पांचै जाण । अनुक्रमें ॥ ३१ ॥
चित्तरूपें आकाशीं मिनलें । प्राणरूपें वायूसी भलें ।
रसनां रूपें गेलें । तेजामधें ॥ ३२ ॥

---

१ यांचा क्रमानें लय पुढील १० वे अध्यायांत २९ वे ओवी पासून ३४ वे ओवी पावेतों दिला आहे. हीं सर्व दवतांचीं नांवें आहेत. त्रिकूटीं असलेल्या कर्मेंद्रियांची देवता निद्राहीन, मनाची उपेंद्र, बुद्धीची क्रुतिपक, चित्ताची गुणक्रतु, अहंकाराची समरि व नंतर वायूपंचक अथवा भूतपंचक यांच्या पांच श्रीज्ञानेश्वरी अध्याय ६ वा यांतील १४ वे श्लोकावरील टीका समजून वाचली तर येथील उलगडा तेथें होतो; त्याचें विस्तारभयास्तव येथें विवेचन करीत नाहीं.

शिस्नरूपें आपणेयांसी । रसरूपें पृथ्वियेसी ।
येवं पंचधा विभागांसीं । आप मिनलें ॥ ३३ ॥
तेजाचे पांच गुण । बुद्दि उदानु चक्षुरूप प्रमाण ।
पादरूप जाण । येवंविध ॥ ३४ ॥
बुद्धिरूपें आकाशीं निरुति । उदानरूपें मिळे मारुतीं ।
राहिली चक्षुची गति । आपेआप ॥ ३५ ॥
पादरूपें मिनलें वारि । रूप गुणें मिनली वसुंधरी ।
येवं पंचधा प्रकारीं । तेज मिनलें ॥ ३६ ॥
वायूचें पांच गुण । मन समानु त्वचा प्राण ।
पाणि स्परिसु जाण । विविध पांचैं ॥ ३७ ॥
मनरूपें आकाशीं गहनीं । समानु आपुलां स्छानीं ।
त्वचारूपें निर्धारूनि । तेजीं मीनला ॥ ३८ ॥
पाणिरूपें आंपीं[1] मिनला । स्पर्शरूपें पृथ्वीयेसि भला ।
येवं पंचधा विभागीं मिनला । वायु देखा ॥ ३९ ॥
आईक आकाशाचे गुण पांच । अंतष्कर्ण व्यानु श्रोत्र त्वचा ।
शब्दु हा पक्षु आकाशाचा । पंचविधु ॥ ४० ॥
अंतष्कर्ण आपुलिये ठांई । व्यानरूपें वायूसी पाहिं ।
श्रोत्ररूपें पांहिं । तेजीं मिनलें ॥ ४१ ॥
पांचाचे पंचवीस गुण । जाण हे योगाभ्यासीं कारण ।
देहीं यांचें ठाउवें विवरण । तरि च समाधि लागे ॥ ४२ ॥
हे नेणतां पंचवीस तत्वता । आपणेयासी ह्मणे अध्यात्मवेत्ता ।
या कारणे तुज रघुनाथा । येकांतु केला ॥ ४३ ॥
हें तुझां मानसीं । जैं बैसैल निश्चियेंसी ।
तैं तुं आसनीं दृढ होसी । लागैल काष्टि ॥ ४४ ॥
ज्ञानदेव ह्मणे निवृत्तीचा । हा भेदु तत्वांचा ।
गोप्य करणें ऐसी वाचा । वसिष्ट रुषिची ॥ ४५ ॥

1 पाणी.

परि मज घडलें बोलणें । तें विश्वोपकारा कारणें ।
मग वसिष्ठाचें होइल कोपणें । तें सांहों येईल ॥ ४६ ॥
पांचांचे पंचविस गुण । परस्पर मिनले जाण ।
स्वरूपप्रति पांच पांच प्रमाण । वर्तति पृथग्विध ॥ ४७ ॥
शब्द स्पर्श रस रूप गंध । हे पांच ही पृथ्वीयेसी प्रसिद्ध ।
वाचा पाणि पाद शिस्न गुद । आपतत्वीं ॥ ४८ ॥
श्रोत्र त्वचा चक्षू रसना घ्राण । तेंजीं हे पांच गुण ।
वर्तती जाण । निर्धारेसीं ॥ ४९ ॥
व्यानु समानु उदानु । प्राणु आणि अपानु ।
ईहीं पंचधा गुणीं पवनु । वर्ततुसे ॥ ५० ॥
मन बुद्धि चित्त अहंकारु । चतुष्टये अंतष्कर्ण विवरू ।
येवं पंचधा प्रकारू । आकाशीं वर्ते ॥ ५१ ॥
शब्दु आकाशाचा ह्मणिजे । परि श्रोत्र पृथ्वीयेचें जाणिजे ।
स्पर्शु पवनाचा बोलिजे । परि त्वचा पृथ्वीयेची ॥ ५२ ॥
रूप देखणें तेजाचें । परि चक्षु पृथ्वीयेचे ।
रस बोलिजती आपाचे । परि रसना पृथ्वीयेची ॥ ५३ ॥
गंधु आणि घ्राण । पृथ्वीयेसी नांदती जाण ।
सुभेदपणें विवरण । कथन केलें ॥ ५४ ॥
वाचा आपीं असे । परि उचारु आकाशीं वसे ।
पाणी सलीलीं असे । परि धरणें वायूचें ॥ ५५ ॥
पाद आंपी असती । परि तेजाचे बोलिजति ।
विवरूनी पाहे स्थिति । रामचंद्रा ॥ ५६ ॥
शिस्न राहिलें आपीं । रस गेले पृथ्विस्वरूपीं ।
येवं पंचधा गुणनिक्षेपीं । आप नांदे ॥ ५७ ॥
वायु पृथ्वी गुद पांहिं । तो नांदे आपाचां ठाई ।
अनुक्रमें विभागु इहीं । केला असे ॥ ५८ ॥
श्रोत्र तेजीं वर्तती । परि आकाशगुण हे निरुती ।
त्वचा वायुगुण बोलिजती । परि तेंजीं असे ॥ ५९ ॥

चक्षु तेजाचे गुण । रसना आपाची प्रमाण ।
पृथ्वितत्वींचे घ्राण । येणें जीव वर्तती ॥ ६० ॥
व्यानु आकाशाचा गुणु निरुति । परि तो नांदे मार
सामानु वायुगुणु निश्चिति । आपुलां स्छानीं ॥ ६१
उदानु तेजा मानी । तो वर्ततसे पवनीं ।
प्राणु असे जीवनीं । वायुतत्वीं ॥ ६२ ॥
अपानु पृथ्वियेचा जाण । मारुतीं नांदे हें प्रमाण ।
येवं पंचधा वर्तती गुण । वायुतत्वीं ॥ ६३ ॥
येणें अनुक्रमें । चतुष्टय अंतष्कर्ण व्योमें ।
गुरुवचनसंभ्रमें । कीजे पवनाभ्यासु ॥ ६४ ॥
आतां पंचमहद्भूतीं । पंचवीस तत्वें असतीं ।
तियें अनुक्रमगती । दाउनि दे ॐ ॥ ६५ ॥
अस्ती मांस त्वचा जाण । नाडी रोम प्रमाण ।
यें पांचै रूपें निर्धारू करणें । पृथ्वीयेचीं ॥ ६६ ॥
शुक्र श्रोणित मज्जा केवळ । मूत्र आणिक लाळ ।
ईं पांचै रूपीं सलिल । देहीं वर्ते ॥ ६७ ॥
नीद त्रुषा क्षुधा कांती[1] । अळसु पांचवा निरुती ।
हें पंचधा गुण वर्तती । तेजापासूनु ॥ ६८ ॥
धावणें वळणें निरोधु । संकोचु प्ररसण बोधु ।
येवं पंचधा नांदणुक वद्यु । पवनु करी ॥ ६९ ॥
काम क्रोध लोभ । मोहो पैशून्य अशुभ ।
येवं पंचधा गुणीं नभ । हें ही वर्ते ॥ ७० ॥
मागील पंचीकृत जालें । पंचवीस तत्वें सांगितलें ।
आतां दशपवनांचें निर्वचन भलें । दाउं वशिष्ठ ह्मणत
प्राणु अपानु समानु । उदानु आणि व्यानु ।
हा पंचधा पवनु । देहीं वर्ते ॥ ७२ ॥

१ क्लांति-ग्लानी.

नागकूर्म कृकलसु । देवदत्तु धनंजयो जाणींजसु ।
दशपवनांचा अवकाशु । देहीं वर्ते ॥ ७३ ॥
प्राणु नित्य हृदयकमळीं । अपानु असे गुदमंडळीं ।
समानु नाभीनळीं । उदानु कंठदेशीं ॥ ७४ ॥
व्यानु सर्व शरीरीं । व्यापूनि असे निरंतरी ।
प्रधान पंच अवधारीं । रघुनाथा ॥ ७५ ॥
नागु पाचांते गवसी । कूर्मु उन्मीलितु आपणयांसी ।
क्षुधा कृकलसु करी निर्धारेंसीं । विशेषें जांभै देवदत्ताची ॥७६॥
वक्त्रीं शब्दु जाला । तो धनंजयो करी भला ।
येवं दशधा बोलिला । पवनक्रमु ॥ ७७ ॥
आंगमोडा व्यानांचा जाण । उकासि उदानांची[1] हे प्रमाण ।
ढेंकरु हे समानांचे गुण । जांभई देवदत्ताची ॥ ७८ ॥
आतां वसिष्ठ ह्मणे रघुटिळका । हा पवनाभ्यासु अति निका ।
येणें ईंद्रियां अशेषां । दमन पडे ॥ ७९ ॥
नेत्र नुघडती भांबळी । कर्णासी पडती टाळी ।
घ्राण रुंधे जिव्हेची वळी । स्थिर होये ॥ ८० ॥
तरि हा मागां सांगितला वृत्तांतु । अनुक्रमें ग्रासि तो अवधूतु ।
निर्वाणकथनसंकेतु । सांगितला ॥ ८१ ॥
तवं रामु ह्मणे गुरुराया । हें पूर्वभाग्य केलें मियां ।
आमचा वंशु उधरावेया । तुह्मीं गुरु जोडलेती ॥ ८२ ॥
हें पवनांचें विवरण । जाणत चि असे कवण ।
ऐसें हें योगनिर्वाण । कोणासी कैचें ॥ ८३ ॥
आतां ह्मणतुसे ज्ञानदेउ । विचित्र वसिष्ठाचा भाउ ।
हा प्राणसांकळीचा अध्याउ । थोरु दुर्गमु ॥ ८४ ॥
हे नेणतां दशपवन । येकु येकासी मिनलेंया कवण गुण ।
यांचें नव्हे चि ज्ञान । तवं निर्वाण कैचें ॥ ८५ ॥

---

1 हें चरण पुन्हां आलें आहे. कदाचित् नक्कलकाराची ही चूक असावी.

चक्षु तेजाचे गुण । रसना आपाची प्रमाण ।
पृथ्वितत्वीचे घ्राण । येणें जीव वर्तती ॥ ६० ॥
व्यानु आकाशाचा गुणु निरुति । परि तो नांदे मारुतीं ।
सामानु वायुगुणु निश्चिति । आपुलां स्थानीं ॥ ६१ ॥
उदानु तेजा मानी । तो वर्ततसे पवनीं ।
प्राणु असे जीवनीं । वायुतत्वीं ॥ ६२ ॥
अपानु पृथ्वियेचा जाण । मारुतीं नांदे हें प्रमाण ।
येवं पंचधा वर्तती गुण । वायुतत्वीं ॥ ६३ ॥
येणें अनुक्रमें । चतुष्टय अंतष्करण व्योमें ।
गुरुवचनसंभ्रमें । कीजे पवनाभ्यासु ॥ ६४ ॥
आतां पंचमहद्भूतीं । पंचवीस तत्वें असतीं ।
तियें अनुक्रमगती । दाउनि दे ॐ ॥ ६५ ॥
अस्ती मांस त्वचा जाण । नाडी रोम प्रमाण ।
यें पांचे रूपें निर्धारू करणें । पृथ्वीयेचीं ॥ ६६ ॥
शुक्र श्रोणित मज्जा केवळ । मूत्र आणिक लाळ ।
ई पांचै रूपीं सलिल । देहीं वर्ते ॥ ६७ ॥
नीद त्रुषा क्षुधा कांती[1] । अळसु पांचवा निरुती ।
हें पंचधा गुण वर्तती । तेजापासूनु ॥ ६८ ॥
धावणें वळणें निरोधु । संकोचु प्ररसण बोधु ।
येवं पंचधा नांदणुक वद्धु । पवनु करी ॥ ६९ ॥
काम क्रोध लोभ । मोहो पैशून्य अशुभ ।
येवं पंचधा गुणीं नभ । हें ही वर्ते ॥ ७० ॥
मागील पंचीकृत जालें । पंचवीस तत्वें सांगितलें ।
आतां दशपवनांचें निर्वचन भलें । दाउं वसिष्ठ ह्मणती ॥ ७१ ॥
प्राणु अपानु समानु । उदानु आणि व्यानु ।
हा पंचधा पवनु । देहीं वर्ते ॥ ७२ ॥

१ क्लांति—ग्लानी.

नागकूर्म कृकलसु । देवदत्तु धनंजयो जाणींजसु ।
दशपवनांचा अवकाशु । देहीं वर्ते ॥ ७३ ॥
प्राणु नित्य हृदयकमळीं । अपानु असे गुदमंडळीं ।
समानु नाभीनळीं । उदानु कंठदेशीं ॥ ७४ ॥
व्यानु सर्व शरीरीं । व्यापूनि असे निरंतरी ।
प्रधान पंच अवधारीं । रघुनाथा ॥ ७५ ॥
नागु पाचांते गवसी । कूर्मु उन्मीलितु आपणयांसी ।
क्षुधा कृर्कलसु करी निर्धारेंसीं । विशेषें जांभै देवदत्ताची ॥७६॥
वक्त्रीं शब्दु जाला । तो धनंजयो करी भला ।
येवं दशधा बोलिला । पवनक्रमु ॥ ७७ ॥
आंगमोडा व्यानांचा जाण । उकासि उदानांची हे प्रमाण ।
ढेंकरु हे समानांचे गुण । जांभई देवदत्ताची ॥ ७८ ॥
आतां वसिष्ठ ह्मणे रघुटिळका । हा पवनाभ्यासु अति निका ।
येणें ईंद्रियां अशेषां । दमन पडे ॥ ७९ ॥
नेत्र नुघडती भांबळी । कर्णासी पडती टाळी ।
घ्राण रुंधे जिव्हेची वळी । स्थिर होये ॥ ८० ॥
तरि हा मागां सांगितला वृत्तांतु । अनुक्रमें ग्रासी तो अवधूतु ।
निर्वाणकथनसंकेतु । सांगितला ॥ ८१ ॥
तवं रामु ह्मणे गुरुराया । हें पूर्वभाग्य केलें मियां ।
आमचा वंशु उधरावेया । तुह्मीं गुरु जोडलेती ॥ ८२ ॥
हें पवनांचें विवरण । जाणत चि असे कवण ।
ऐसें हें योगनिर्वाण । कोणासी कैचें ॥ ८३ ॥
आतां ह्मणतुसे ज्ञानदेउ । विचित्र वसिष्ठाचा भाउ ।
हा प्राणसांकळीचा अध्याउ । थोरु दुर्गमु ॥ ८४ ॥
हे नेणतां दशपवन । येकु येकासी मिनलेंया कवण गुण ।
यांचें नव्हे चि ज्ञान । तवं निर्वाण कैचें ॥ ८५ ॥

१ हें चरण पुन्हां आलें आहे. कदाचित् नक्कलकाराची ही चूक असावी.

थोरू सूर्यवंशु भाग्याचा । केवडा अभिमानु योगाभ्यासाचा ।
न धरिती कष्टांचा । सीणु मनीं ॥ ८६ ॥
काम क्रोध मद मस्छरू । डंभ प्रपंचु अहंकारु ।
आशा मनीशा तृष्णां विकारू । आथी चि ना ॥ ८७ ॥
यैसी देखानु पूर्वाम्नाय स्छिति । आणि रघुनाथाची आर्ति ।
ते बोलवितसे प्रीति । गुह्य जीवांचें ॥ ८८ ॥
नां तरि बहुता[1] युक्ति । योगु सांगितला अर्जुनाप्रति ।
तेथ सिष्यासी नांही आर्ति । तें श्रीकृष्णु चि बोले ॥८९॥
धारणा ध्यान आसन समाधी । हें सांगितलें षष्ठादि ।
ऐसी पवनगति सुधी । नोबलती ॥ ९० ॥
पवनाभ्यासाचा गुरू । याज्ञवल्क्यु आइकिजे थोरू ।
तो हि दशपवनांचा मीळनी विवरु । न बोले चि ॥ ९१ ॥
आणिक येक अवधारा । आह्मांसीं गुरू आदिशंकरा ।
दुसरी पाईरी अवधारा । मछेंद्रनाथु ॥९२॥
तो आदिकरूनी गयणीनाथुवरी ।
यांसी पवनाभ्यासीं प्रीति थोरी ।
परि ते पंचतत्वांची कुसरि । न बोलती चि तेथें ॥९३॥
परि येणें येकें प्रसंगें गुणें । वसिष्ठ रुषि रामें येकांतु भोगणें ।
कीं तये चि अवस्वरीं पाहुणें । आलों आंह्मी ॥ ९४ ॥
हें शास्त्र मऱ्हाटि करितां । तेथिचा भाऊ तत्वता ।
निवृत्तिप्रसादें सर्वथा । परिणमला ॥ ९५ ॥
तवं गुरु ह्मणती कोणु नवलाऊ । तुज कळे वसिष्ठाचा भाऊ ।
परि प्राणसांकळीचा अध्याऊ । बरवा अर्थिला[3] ॥ ९६ ॥

---

१ हें तृतीयेचें रूप पहाण्यासारखें आहे. २ जैसें श्रीज्ञानेश्वरांत अर्जुनाचे वेळीं श्रोते वक्ते हे पाहुणे आले त्याचप्रमाणें येथें ही; पहा:– “साहाजें ब्रह्मरसाचें परगुणें । केलें अर्जुनालागि नारायणें । किं तिया चि अवसरीं पाहुणे । पातलों आह्मां” ॥ २ ॥ श्री॰ज्ञा॰ १४. ३ अर्थ केला. नाम पासून क्रियापद करण्याची महाराजांची हतोटी प्रसिद्ध च आहे.

तवं निवृत्ति ह्मणे ज्ञानमूर्ति । श्रीरामु पुसतुसे आत्मस्थिति ।
वसिष्ठ रुषि सांघति तें चितीं । बरवें धरिं ॥ ९७ ॥
ज्ञानदेउ ह्मणे गुरुराया । मिं मस्तक ठेउनी तुमचेया पायां ।
येक अक्षर संस्कृतिचें जाउ नेंदी वाया । ऐसें आर्थीन॥९८
जें गुह्यांत गुह्यतर । जें परब्रह्मांचें सार ।
जेया कारणें ब्रह्मा विष्णु महेश्वर । कष्टताती ॥ ९९ ॥
जें न लक्षवें मनें । न चिंतवे ज्ञानें ।
साधिजे पवनें । काष्टीं लाउनी ॥ १०० ॥
जेणें मीळिजे परात्पर तरी । पुनरपी न येजे मातेंचां उदरीं ।
न सीणिजे येरझारीं । चुके भवार्णव ॥ १०१ ॥
नाहिं या सारिखें गोड । नाहिं याहूनु वाड ।
इंद्रियां देउनी कवाड । येकांतीं भोगिजे ॥ १०२ ॥
जें परवस्तूचें मंदीर । सर्व सुखाचें वसुवार ।
जयाचें नेणती पार । हे तिघे जण ॥ १०३
ऐसीये वस्तूचें साधन । सांघताति वसिष्ठ रुषि आपण ।
निमित्त करूनि रामा श्रवण । उद्धरण तिहीं लोकां ॥१०४॥
ॐ तत्सदिति श्री योगवासिष्ठे । वसिष्ठरामसंवादे प्राणसांकळी विवरणं नाम नवमोध्यायः ॥ ९ ॥

## ॥ अध्याय दहावा ॥

श्रीपरमात्मनेनमः ।

जिहीं पाहिलें वेदांचें पार । जाणितलें सारासार ।
वेदार्थु स्मृतिशास्त्र । केलें जिहीं ॥ १ ॥
पाहिलीं वेदांतें । ढांडोळिलीं सिद्धांतें
ऐसे ज्ञाते । त्यांसी नमन ॥ २ ॥
नमन सिद्धां साधकां । आत्मज्ञानियां पूरुषां ।
ध्यान समाधि साधकां । नमन माझें ॥ ३॥

असौनि गृहाश्रमीं । जे सुटले सर्व कर्मीं ।
उदास सर्व धर्मीं । तेयां नमन ॥ ४ ॥
शास्त्रीं नाहिं अधिकारु । जेयांसिं भेटला नांहि सद्गुरु ।
तो या वासिष्ठाचा पारु । केवि जाणे ॥ ५ ॥
डिंभकु धूर्तु बुद्धि जाण । सभे आंतु हालवीं मान ।
तें पशु प्राणिये अज्ञान । अहंकारी ॥ ६ ॥
त्यासि ही परि नमस्कारु । तुह्मीं कीजे गर्वपरिहरु ।
अध्यात्मेंवीण संसारु । निरयपूरु ॥ ७ ॥
पावौनु नृदेह पुण्यसायासीं । अध्यात्मज्ञान जो नाभ्यासीं ।
तो मातेचां कुसीं । पाषाणु जन्मला ॥ ८ ॥
त्यासी वृथा संसारीं आगमन । वृथा चि मातेसी वेदना ।
उत्तीर्ण नव्हे चि स्तन्यपाना । मातेचिया ॥ ९ ॥
तो जाला भूमिभारू अद्भुतु । आपुलिया कुळासी कुळकेतू ।
दावावेया निरयपंथू । बेताळिसांसीं ॥ १० ॥
कीजो समस्त तीर्थस्नानें । कीजो पृथ्विदानें ।
विप्रां पित्रां देवतां अन्नें । देयो भलेतैसीं ॥ ११ ॥
बैसौनु यमुनांतटीं । मंत्रु जपिजे लक्ष कोटि ।
यांचे फळ भोगावेया सेवटीं । संसारा येईजे ॥ १२ ॥
तैसा नोहे योगेश्वरू । जया देखतां जाती ब्रह्मा विष्णु महेश्वरू ।
चंद्र सूर्य पृथ्वी आकाश पाताळ निराकारू । होये जाये ॥१३॥
ऐसा थोर अध्यात्मपंथु । तवं बोलिले निवृत्तिनाथु ।
बोलैं जें असे सांगतु । वसिष्ठ रुषि ॥ १४ ॥
तेथ गुरूतें सिष्यु पुसे । जी हें अनुभकरण कैसें ।
तें चिन्ह कृपावशें । कथन कीजे ॥ १५ ॥
तवं वसिष्ठ ह्मणती आईक । तें तुज सांगैन अशेख ।
जेणें संतोषती अध्यात्मिक । आत्मवेत्ते ॥ १६ ॥

रामु ह्मणे हा प्रश्णु सेवटिचा । जो अभ्यासु दशदेहाचा ।
तुमचेया अमृत वाचा । मिळिजे अव्यक्तीं ॥ १७ ॥
गुरु ह्मणती प्रथमारंभीं । बैसिजे वज्रासनें[1] स्वयंभीं ।
भूमीं खूतले जैसे स्तंभीं । तैसा दृढु ॥ १८ ॥
मग मूळबंधु[2] देईजे गुदस्छानीं ।
ऊढियाणु बांधिजे नाभी आंकोचौनी ।
जाळांध्रि बंधु घडिजे गहनीं । तिजे देखा ॥ १९ ॥
गुदस्छानींचेनि मूळबंधें । अपानु भीतरां रुंधे ।
नाभीं ऊढियाणां समंधें । उलटु होये ॥ २० ॥
कंठा कीजे संकोचन । तरि जाळांध्रि बंधु पाडिला जाण ।
घडे सप्तद्वारा रुंधन । वायुची धाव कुंठे ॥ २१ ॥
पियुषपतन राहे । ऐसा जाळांध्रि बंधु पाहे ।
अधउर्ध निरोधनें होये । आन देख ॥ २२ ॥
जई[3] अपानांची वाहुटळी उठी । ते रिघे बाहात्रीं कोटी ।
मूत्रा शोषी सेवटीं । गोटि करी मळातें ॥ २३ ॥

---

१ ‘ सिद्धासन ’ यास च गौण नांव वज्रासन आहे असें श्रीज्ञानेश्वरींत ह्मटलें आहे. त्याचें स्वरूप असें:—चरणतलें देव्हढीं । आधारद्रुमाचां बुडीं । सुघटितें गाढां । संचरि पां ॥ ९३ ॥ सव्य तें तलीं ठेविजे । तेणें सीवणीमध्यु पीडिजे वरि बैसे तो साहाजें । वामचरणु ॥ ९४ ॥ गुदमेंढ्रा आंतौतीं । च्यारि चि अंगुलें निरुतीं । तेथ सार्द्ध सार्द्ध प्रांतीं । सांडूनियां ॥९५॥ माझि अंगुल एक नीगे । तेथ टांकेचेन उत्तर भागें । निहटिजे वरि आंगें । पेललेनि ॥ ९६ ॥ उचललें कां नेंणिजे । तैसें पृष्ठांत उचलिजे । गुल्फद्वय धरिजे । तेणें चि मानें ॥ ९७ ॥ अर्जुना हें जाण । मूलबंधाचें लक्षण । वज्रासन गौण । नाम एयासि ॥ ९९ ॥. २ बंध ह्मणजे वायूस अडविणें. तीन ठिकाणीं वायू अडवितात, गुद, नाभी, व कंठ. त्यास अनुक्रमें मूल, ऊढियाणा, व जालंधरबंध ह्मणतात. पहिल्यानें अपानाची गति बंद होते, तिसऱ्यानें प्राणाचा संचार थांबतो, व दुसऱ्यानें या दोघांची भेट होऊन सुषुम्नेकडे ते एक होऊन जातात. ३ ई मोडीतील ई प्रमाणें आहे.

अपानकंदु गुरुगुरी । विविध परीची व्यथा करी[1] ।
उदरांतें अफांरी । अफारला ठाके[2] ॥ २४ ॥
ऐसें बहुती परी पहातां । प्राणा अपाना ऐक्यता ।
नेदखे चि निर्गता । मग उलटु होये ॥ २५ ॥
मग अष्ट वग्त्र षट्धारा । उकलौनि आउठ वेढे[3] गा रघुवीरा ।
आंतूनि निगे उर्ध शिखरा । कुंडलिनी शक्ति ॥ २६ ॥
तेणें कुंडलिनीचेनि विवरें । प्राणु अपानु मोहरे ।
तो भेदी येकसरें । कपाळ माळिका ॥ २७ ॥
तेणें उर्धगमन अंतरीं । षट्चक्रें भेदुनु निर्धारी ।
मारुतु भरला अंबरीं । मणिफूळेंपंथें[4] ॥ २८ ॥
तेथ प्रथमारंभीं त्रिकुटीं । इंद्रिये ग्रासिली परिपाठीं ।
लयो जाला सेवटीं । निद्रा हि नांसी ॥ २९ ॥
पुढां श्रीहटाचां ठाईं । मन ग्रासलें पाहिं ।
उपईद्रु नांहिं । जाला तेथ ॥ ३० ॥
पुढें निश्चायात्मक बुद्धि । ते ग्रासिली निरवधी ।
सवें चि लयो तत्समंधी । कृतिपकासी ॥ ३१ ॥
पूढां चित्तसहितु गुणकृतु । ग्रासुनु निगाला अवधूतु ।
समरु ग्रासिला निश्चितु । त्या हि पुढां ॥ ३२ ॥

१ पहाः नाडीतें सोडवी । गात्रांतें विघडवी । साधकांतें भेडसावी । पारि बिहावें ना ॥ श्रीज्ञानेश्वरी ६×२१९. २ पहाः—नाभीवरी पोखे । उदर हें थोंके । आंतरीं फांके । हृदयकोश ॥ श्रीज्ञा. ६×२०९. ३ कुंडलिनी साडेतीन वेढे देऊन सुषुम्नेचे तोंडाशी निजलेली आहे. ४ मणिपूर ह्मणून शरीरांत एक चक्र आहे. तें नाभीं जवळ आहे. येथें प्राणापानाची गांठ होते. येथें अपान मूलबंधानें अडला जाऊन ‘ क्षोभलेपणें माजे । उवाइला ठाइं गाजे । मणिफूलेसिं जूंझे । राहूनिया ॥ ५ हा क्रमाक्रमानें लय कसा झाला तो श्रीज्ञानेश्वरी अ. ६यावरून दिसतो. “आइकें पार्थिव धातु आघवी । आरोगितां कांहीं नुरवी । आणि आपांतें तंव ठेवी । पुसूनियां ॥ २३९ ॥ ऐसीं दोनीं भूतें खाये । तेव्हळी संपूर्ण धाये” । अशीं दोन भूतें गेलीं ह्मणजे मग ‘ मनु गिवासितां न दिसे ’ ॥ २४५ ॥ मन जातें नंतर ‘बुद्धिची पुलिक विरे ॥ ’ २४६.

त्याहि वरि सांख्यु ग्रासिला । अर्या उद्भउ वारिला ।
सप्तेशु लया आणिला । विकार ग्रासें ॥ ३३ ॥
कृतीपकु ग्रसिला पाहिं । लयेनु लया गेला आपुलां ठाईं ।
देह सविकार[1] ग्रासूनि राही । ते स्वकीय स्थिति ॥ ३४ ॥
उपजे नां मुरे । ऐसीये विषमसंधी निर्धारें ।
स्वयं सर्व निरंतरें । येक चि देखे ॥ ३५ ॥
हें आइकतां पवनसाधन । रामाचें लक्षीं लागले लोचन ।
बुडालें मन । समाधिडोहीं ॥ ३६ ॥
जैसें येकी भांडाहूनि आणिके भांडीं ।
येके कुंडीहूनि आणिके कुंडीं ।
अमृत सांठविलें तैसी परवडी । जाली गुरु सिष्यासी ॥३७॥
नां तरि दीपें दीपु लाविजे पुरा । तो नेणवे चि कोणु दुसरा।
गुरु सिष्या संसारा । उरे चि नां ॥ ३८ ॥
येथ वसिष्ठाचें मन आनंदलें । ह्मणे म्यां सुक्षेत्रीं पेरिलें ।
दिवसेंवीण पिकलें । तात्कालिक ॥ ३९ ॥
काई वर्णु जें उपजला वंशीं । किं जन्मला जिचीये कुसीं ।
यें दोन्हीं माव यासी । परब्रह्म तें हा ॥ ४० ॥
ऐसें ह्मणौनु वसिष्ठ रामांते थापटि । उघडवीं नेत्र फिटे काष्टि।
तो ह्मणे स्वामी हे आइकतां चि गौष्टि। जाला आत्मबोधु॥४१
रामु ह्मणे रुषिराया । हें कैसेनि पवाडलेती[2] सांगावेया ।
साखर मुकियासिं दिधली चाखावया। तैसें मज जालें ४२॥
आतां समस्त सांगितलें योगसार ।
संस्कृतीं गुंपी पडली होती थोर ।
ते मऱ्हाटी केली परिकर । ह्मणे ज्ञानदे ॐ ॥ ४३ ॥
आतां कर्मि अकर्मि ऐसें । ग्रासु किजे अनुक्रमवशें ।
कर्म होउनु निर्धारवशें । परि मुक्त अकर्मगा ॥ ४४

१ ‘ दशाविकार ’ हें पाठांतर. २ पवाडणें=शिरणें. रिघणें अवकाश मिळणें; येथें ‘ सांगणें कसें शक्य झालें ’ हा भाव.

आंगुळियेसिं सूत गुंडिजे । तयातें कर्म ह्मणिजे ।
कर्म निर्धारें जाणिजें । बंधन ह्मणौनी ॥ ४५ ॥
तें चि उकलिजे निधडें । तें कर्म करणें फुडें ।
कर्म चि परि अकर्म घडे । मुक्त ह्मणौनु[1] ॥ ४६ ॥
तै रचनां ग्रासितु निगाला । तो क्रमु होये भला ।
तो कर्मि चि अकर्मि बोलिला । मुक्तार्थें[2] ॥ ४७ ॥
ह्मणौनी कर्मीं अकर्म ऐसें । तें जाण निर्धारवशें ।
आतां कर्मीं कर्म कैसें । ते सांघो तुज ॥ ४८ ॥
जो खडतरां किरणीं तांतलौ[3] । तो द्रुमछाये बैसला ।
किं तेथें निवाला । गेला श्रमु ॥ ४९ ॥
तरि काइ तेणें द्रुमें निर्धारें । त्यासीं घातले विजण वारें ।
कांहिं न करितां निर्धारें । निवाला तो ॥ ५० ॥
भानु गगनीं स्वभावें । भूतळीं सूर्यकांतु जाणवे ।
दोन्हीं पासाव प्रसवे । वन्हि येकु ॥ ५१ ॥
तरि काइ सूर्यें केलें । किं मणीचां ठांईं कर्तुत्व आलें ।
दोहिं न करितां प्रसवलें । वन्हिबिंब ॥ ५२ ॥
तैसें आपुलिये ठांईं । स्वकीय स्थिति असे पांहिं ।
रचनांउद्भव कांहिं । असे तेथ ॥ ५३ ॥
स्वकीय स्थिति पहातां । रचनां उद्भव नाहिं सर्वथा ।
परि स्वरूपासिं संचरतां । निचेष्ट असे ॥ ५४ ॥

---

१ कर्मकर्मांची ही व्यवस्था अत्यंत सुलभ व सुबोध आहे. बोटानां सूत गुंडाळणें अथवा गुंडाळलेलें सोडविणें, हीं दोन्हीं कर्में च, परंतु एकानें 'बंध' उत्पन्न होतो, ह्मणून तें कर्म, व दुसऱ्यानें 'मोक्ष' होतो ह्मणून तें अकर्म. २ योगी, मागें सांगितल्याप्रमाणें योगद्वारा पंचमहाभूतें अंतःकरण चतुष्टय यांचा ग्रास (लय) करतानां खरोखर एकप्रकारें कर्म च करतो, परंतु तें मोक्षपद असल्यानें तें 'अकर्मा' च्या पदवीला जातें; याचें च नांव कर्मीं अकर्म. ३ तांतवणें=त्रासणें.

स्वकीय स्थिति असे । आरुतिं आटाणि निर्धारवशें ।
न करितां करणें ऐसें । जाणावें गा ॥ ५५ ॥
पर्ण देटूनु तुटे । त्यासी सींचन घटे ।
तें कोद्रवाचेंनि[2] कूटें[3] । जिये[4] सामास ॥ ५६ ॥
तैसी रचना परवस्तूचां ठांई । पाहातां आथी चि नाहिं ।
परि आरुति संचरली कांहिं । असे देखां ॥ ५७ ॥
ऐसिया स्थिति असतां । संयेमु सांघेन आतां ।
आइकै रघुनाथा । सिष्य राजा ॥ ५८ ॥
प्रज्वललिऐ ब्रह्माग्नि समस्तिं । जंवं मागेल भुक्ति ।
तंवं ग्रासु आहुती । घेतां जाइजे ॥ ५९ ॥
समस्त दिनमानें । मार्गु कमिजे गहनें ।
तरि केलां सप्त मैथुनें । तितुकि तुटी ॥ ६० ॥
ह्मणौनु सिंहनादु[5] आईकीजे । इतुकें चि पेणें[6] किजे ।
पद हळु हळु घालिजे । निरक्षिजे हस्त दोनी[7] ॥ ६१ ॥
बहुत बोलणें न कीजे । युक्ति निद्रा कीजे ।
ऐसिया संयम स्थिति तरिजे । गुरुवचनें ॥ ६२ ॥
आतां परिस गा दाशरथी । हे सांगितली योगस्थिति ।
ते धरून चित्तीं । कीजे तनुत्यागु ॥ ६३ ॥
हे तुह्मांसी वंशपरंपरा । चालिलें असें गा रघुवीरा ।
तुंवा पुसिलें अनुभवसार । सांघितलें म्यां ॥ ६४ ॥
तुमचा वंशु मनुपासाव जाला । मनुचा वंशीं दिलीपु उपजला ।
दिलिपा पासाव जन्मला । रघु पुण्यराशी ॥ ६५ ॥
त्या पासाव जन्म जालें अजा । तो तुझा आजा ।
त्या पासाव दशरथु राजा । जो रुषिविश्रामु ॥ ६६ ॥
त्या दशरथा राज्य करितां । आश्राईलें रुषी समस्तां ।
धारणा ध्यान समाधिस्तां । असति तपोवनीं ॥ ६७ ॥

---

१ अरौतें=अल्प, थोडें. २ कोद्रू नांवाचें धान्य. ३ पीठ. ४ जीवंत राहतें.
५ ' शिंगीनाद ' पाठांतर. ६ मुक्काम. ७ ' गाति ' पाठांतर.

कव्हणा येका अवस्वरा । रुषिसमूह आले राजद्वारा ।
दशरथु आला सामोरा । साशंकितु ॥ ६८ ॥
कबरींभार सोडिले । रुषेश्वरांचे चरण झाडिले ।
अकस्मात काहूर वांहूरे[1] । केवि तुह्मीं ॥ ६९ ॥
ह्मणती राया असे विनवणी । हा शनि भेदितुसे रोहिणी ।
शकट्ट भेदिलेयां अवर्षणि । पडति बारा ॥ ७० ॥
हें देखिलें वर्ततां । येथें राहों नये गा दशरथा ।
लवकरि भला टाकितां[2] । बदरिकाश्रमु ॥ ७१ ॥
जालेया अरिष्टाचें ज्ञान । न पवतां चि किजे सूचनां ।
जवं असे दिवसालंबन । तवं निर्गो दिजे ॥ ७२ ॥
आगा दिवसु तवं मार्गा चिंतवणि । वरो तवं चि वाणि ।
जवं दिवसा चि लांबणिं । तवं निर्गो दिजे ॥ ७३ ॥
घरासी लागलेयां वन्हि । कूंपु रचणें निगती कवणिं ।
असे दिवसाची लांबणि । तवं टाकूं बद्रिकाश्रमु ॥ ७४ ॥
ऐसें रुषीश्वर बोलिले । तवं दशरथाचें मन दुचित जालें ।
ह्मणे इतुकें आयुक्ष म्यां सारिलें । यांच्या संगतीं ॥ ७५ ॥
ऐसे पवित्र हे जाती । मग काइ करावी हे राज्य संपती ।
हस्ति घोडे पदार्थि । कोणु उपेगु ॥ ७६ ॥
मग दशरथु होउनु निश्चिंतु । रुषीश्वरांतें असे विनावितु ।
तेरा दिवस पर्यंत । धीरु कीजे ॥ ७७ ॥
तेव्हळीं दशरथें निसाणु[3] । अर्फावि[4]ला समस्त साहाणु ।
वारु जाली पालाणं[5] । पातला रोहिणीं शकट ॥ ७८ ॥
केला रोहिणी शकटीं मेळाकारु । तवं पातला तेथ शनैश्वरू ।
युद्ध जालें थोर । तें विस्तारें सांघों न ये ॥ ७९ ॥

---

१ कावरें बावरें. संकटानें बावरे झालेले असे. २ टाकिणें—पावणें. ३ एक वाद्य, दुदुंभीप्रमाणें असतें. पहा ' घावो घातला निसाणीं ' ४ वाजविला ? ५ पल्याण=खोगीर.

तैं दशरथाचा मोडला रथु । तेथ कैकया सूदलां[1] हातु ।
तैं वरु मागितला हा वृत्तांतु । पुराणीं असे ॥ ८० ॥
सांघतां असिजे संकळितें । पराभउनी शनीश्वरातें ।
संतोषौनि दशरथातें । प्रसंन जाला ॥ ८१ ॥
ऐसें त्यां रुषीश्वरां कारणें । शनीश्वरातें झुंझणें ।
चुकाविलें अवर्षणें । राहाविले रुषि ॥ ८२ ॥
हे सांघावयासिं कारण । संतसंगतीविण ।
नोहे आत्मज्ञान । जाण निरुतें ॥ ८३ ॥
तवं रामु ह्मणे परब्रह्म अवतारा । अहो जी कृपासागरा।
जेयांसि योगु परिणमला पुरा । त्यांची लक्षणें कैसिं ॥८४॥
जयांचे धगधगीत नेत्र । कडकडीत जंत्र ।
शरिर त्वचा मात्र । झांकोळलें दिसे ॥ ८५ ॥
सुवर्ण मृत्तिके आंतु पडे । तुक तुटे वांनी चढे ।
जालेयां पिंडाचें घडे । तेज जैसें ॥ ८६ ॥
पाठीसिं लागलें पोट । शिराजांळी बांधली हाडांची मोट ।
शरीर जैसें हळुवट[2] । वारितरंग ॥ ८७ ॥
द्रिष्टि चरणीचयां आंगुठां । नेणें रुपला हरळु कांटा ।
चालतां तापलीया वाटा । पोळला नेणें ॥ ८८ ॥
नाहिं कंथा कडासन । जें का इछेसी कारण ।
पर्जन्यु शीत ऊष्ण । ज्यासि जाणवेनां ॥ ८९ ॥
नाहिं क्षुधा पिपासा । न कल्पी कांहि चि मानसा ।
साधूनि युक्ति अभ्यासा । वर्तति त्रिभुवनीं ॥ ९० ॥
त्यांसिं सारिखे शत्रुमित्र । सारिखे विषअमृत ।
निंदा आणि स्तौत्य । समान त्यांसिं ॥ ९१ ॥
विचरितां लोकीं दृष्टी । नाहीं गुणिं नां दोषीं ।
पुढिलाचां दुखीं । दुखवती जे ॥ ९२ ॥

---

१ सूदणें=घालणें. २ हलकें.

जो देखिजे सिष्यवत्सळु । सर्वभूतीं कृपाळु ।
जो मानाभिमानें अळुमाळु । घेपवेना ॥ ९३ ॥
जो सदा न वचे[1] जनीं । ज्यांसि बहू संतोषु वनीं ।
जो नेटला उन्मनीं । नाठवे मिं ॥ ९४ ॥
ऐसे योगीये कृतीं । त्यांचां अर्धार्ध त्रेतीं ।
द्वापारें होती । तृतियांशें ॥ ९५ ॥
त्रेताचेनि चतुर्थांशें कळियुगीं । देखिजे जो योगी ।
तो गुरु करावेया लागि । निका जाणें ॥ ९६ ॥
या सांघितलीया खुणां । आईकैं[2] गा रघुनंदना ।
हें शास्त्र चि प्रमाण । अभ्यासावेया ॥ ९७ ॥
शास्त्रद्वा गुरुवक्त्राद्वा ग्राहयेत् साधयेत्पुनः ॥ ७ ॥
रामु ह्मणे पवित्र मूर्ति । तुझां दर्शनी निवृत्ति ।
पुढां डंभीक गुरु होती । ते उ्ळखावे कैसे ॥ ९८ ॥
धरुनु संतांचा वेषु । भुलविती लोकु ।
त्या गुरुसिष्या नरकु । विशेषें गुरुसि ॥ ९९
सांडविती पूर्वाम्नाये कुळकर्मु । जो वर्णोपार्जिकु धर्मु ।
आपण सांगती सवर्मु । नव्हे मान्यु ॥ १०० ॥
आपण लटिका भंडिकु । स्वधर्मु सांडउनु भुलवि लोकु ।
त्या गुरूसि नर्कु । ऐसा वेदु बोले ॥ १०१
डंभिकाचें लक्षण । वसवी पुर पाटण ।
करी राज्यदर्शन । आशावद्धु ॥ १०२ ॥
अनेगेपरिचिया माळा । बाहियेसि मणिगटिं गळां ।
कानीं कुंडलें झळाळा । धोत्र उ्ल्[3] ॥ १०३ ॥

---

१ संचरे. कार्याकार्याची विचारणा करण्याकरितां एकांत हा अवश्य आहे. अगदीं जनसंमर्दात राहून कार्यनिश्चिति होत नाहीं व अगदीं एकांत सेवल्यानें हि कार्योत्पत्ति होत नाहीं. तेव्हां कांहीं संग व कांहीं त्याग हीं अवश्य आहेत असें श्री ज्ञानेश्वरींत व श्रीदासबोधांत संबोधिलें आहे. 'बहुतकरूनि आवड । एकांतीची' हें च अभिमत आहे. २ ई मोडी ई प्रमाणे आहे. ३ 'ओली वस्त्रें. कोणास उद्देशून वर्णिलें तें कळत नाहीं.

देवपुजा न चे बैलां[1] । उपकरणें झारिया डंभु भला ।
ऐसें देखौनि जिहीं गुरु केला । ते मूर्ख ॥ १०४ ॥
नांव ठेविती निकें । जैसें ईश्वरोंसिं तुकें ।
नांव चि आईकौनु[2] येकें मूर्खें । भाळति पैं १०५ ॥
मंत्रा तपाचिया सामर्थीं । ह्मणे दे॰सके राज्यसंपति ।
आत्मस्तुति करिति । वाजे घांट जैसि ॥ १०६ ॥
ह्मणे तपाचेनि बळें । उभीं केलीं पांगुळें ।
दिधले आंधळियांसि डोळे । वांझांसि पुत्र ॥ १०७ ॥
तैसें चि सौविल[3] सिष्य । घराघरा प्रवर्तती लोक ।
ह्मणति गोसांवियां सारिखे आणिक । नाहिं पै ॥ १०८ ॥
ज्ञानहिनो गुरूस्त्याज्यो । मिथ्यावादी विडंबिक: ॥
स्वविश्रांतिं न जानाति । परेषां किं करिष्यति ॥ १ ॥
शास्त्रदृष्टानुमानेन: कथयातर्कमुद्रया ॥
बोधयेत्तु गुरुस्त्याज्यो यमलोकप्रवेशक: ॥ २ ॥
ऐसे जें डंभीक । तेयांचे जे सिष्य ।
दोघै होउनि क्रिमि विशेष । निरयकुंडीं ॥ १०९ ॥
ज्ञानदे॰ म्हणे श्रोतया सर्वां । हा अध्या॰ दाहावां ।
अध्यात्मविद्येचा निजावा । अमृतसिंधु ॥ ११० ॥
नांतरि उपमां देखों कल्पतरूची । तरि उणीव असे संताची ।
तो वाट पाहे कल्पावेयाची । हा अकल्पित दे ॥ ११ ॥
नुरिजे चिंता कल्पनां । नुरति आशा मनीषा तृष्णा ।
या वासिष्ठासि कवणां । उपमां देयावि ॥ १२ ॥
वासिष्ट नोहे निजधामांचें मंदीर । किं परवस्तूचें वसुवार ।
नां तरि ॐ काराचें मनोहर । भद्रपीठ ॥ १३ ॥
नां नां सर्वाश्रमांचें सत्व । किं सर्व देवांसि ध्येय तत्व ।
सर्व सिद्धांचें निश्चित । सुखद्धाम ॥ १४ ॥

---

१ जुनी गेलेली अक्षरें येथें गिरवलेलीं असल्यानें तीं बरोबर लागत नाहीं. ‘ देवपूजा न च ये बैला ’ या पाठांतरानें अर्थ सुलभ आहे. २ ई मोडी ई प्रमाणे आहे. ३ पहांटे.

किं रामचंद्रु करूनि निमित्तभासु। वसिष्ठें निर्मिला काविळासु[1]।
सर्व जीवां निवासु। अव्यक्तु जो ॥ १५ ॥
वासिष्ठु नव्हे भवसमुद्रींचें तारुं। टाकावेया परवस्तूचा पारु।
तारावेया दुरंदरु संसारु। प्रव्हांण हें ॥ १६ ॥
जेथ अव्यक्ताची स्तुति। तेथ अव्यक्तु साधिती युक्ति।
अव्यक्तीं व्यक्ति। उपमां नाहिं ॥ १७ ॥
सांधता परिसता दोन्ही। गेला येक चि होउंनी।
ते जयासि गेले मिळौनिं। तें हि निरोपम ॥ १८ ॥
कामधेनु कल्पतरु चिंतामणि। हें उपमा वेदीं पुराणीं।
ईयें मार्गीं कवण्हीं। फुका हि नेघति ॥ १९ ॥
ह्मणौनु या वासिष्ठा। उपमोसि कुंठलिया वाटा।
या वासिष्ठा सारिखें वासिष्ठ। आणिक नाहिं ॥ १२० ॥
पूर्वजांच्या सुकृताची थोरी। महापुण्यें केलीं कोटीवेऱ्ही।
हें वासिष्ठ असे त्यांचां घरीं। ऐसें वेदु बोले ॥ २१ ॥
हें शास्त्र सांघातें वाहे। येथिचा अर्थु अनुष्ठूनि पाहे।
गुरु भेटे तवं होये। बहु सोपान ॥ २२ ॥
पहिला अध्याउ वाची। तरी इछा[2] उपजे संतसंगाची।
सांडि संगती मूर्खांची। खंडज्ञान तुटे ॥ २३ ॥
दुसरा अध्याउ वासिष्ठाचा। जो दोषु बोलिला सिष्याचा।
तो वाचितां अवगुणांचा। त्यागु घडे ॥ २४ ॥
तेथिचीं सिष्याचीं लक्षणें सुष्टें। वाचितां आंगिं घटे।
लागती सुष्टे वाटे। मनोधर्में ॥ २५ ॥
पुढां तिसरा अध्याई संतप्रशंसा। तो वाचितां मनोभाउ ऐसा
कांहिं होये भरवंसा। अंतष्करणांसि ॥ २६ ॥
चौथां अध्याई। षटदर्शनांची बोली पाहिं।
तेथ निर्वचेंनां कांहिं। अद्यापि भांडणें ॥ १२७ ॥

---

१ कैलास. २ इ मोडी इ प्रमाणें आहे.

पांचवा बोलिला युगधर्मु । तो केवळ विश्रामु ।
वाचितां फिटे भ्रमु । मोक्षाचा पैं ॥ २८ ॥
वाचितां साहावां अध्याॐ । तुटे ग्रुहाश्रमीचा मोहो ।
निरया नेता प्रवाहो । ऐसा जाणावा ॥ २९ ॥
सातवा अष्टांगयोग साधन । तेणें योगीं प्रवर्ते मन ।
आठवा सर्वांतरात्मयाचें लक्षण । निर्लेप जें ॥ १३० ॥
नववां अध्याॐ वेळोवेळीं । सानुभविल्या गुरुजवळी ।
अभ्यासी प्राणसांकळी । तो धन्यु ॥ ३१ ॥
ह्मणौनि हें अहिर्निसी । वासिष्ठ वाहे हृदयेंसी ।
वाचितां निरसी । संसारउपाधि ॥ ३२ ॥
ह्मणौनि या कारणें । हें वासिष्ठ संग्रहणें ।
संस्कृताहूनी लक्षगुणें । अधिक हें ॥ ३३ ॥
हें वेळोवेळां बोलतां । विद्वांस म्हणती ग्रंथ विस्तरतां[1] ।
मऱ्हाटि न पाहातां । श्लोकार्थु[2] ॥ ३४ ॥
अहंता निरयासि कारण । अहंता निरयाचे परिव्हांण ।
अहंता विध्वंसी ध्यान । ज्ञानाते लपवी ॥ ३५ ॥
म्हणौनु तुम्हीं शास्त्रवेत्तां । सर्वथा न करावी अहंता ।
मऱ्हाटि पाहातां । उणीव नाहिं ॥ ३६ ॥
जो तत्ववेत्ता आणि शास्त्रज्ञु । आत्मबोधीं लीनु ।
तो देईल मानु । येर भूईभार ॥ ३७ ॥
शास्त्रीं आरुता ना परौता । त्या निंदकांची नाहिं चिंता ।
पाहे पां सुणें भुंकतां । कोणिंह वारुं शके ॥ ३८ ॥
नाहिं रिगु अध्यात्मशास्त्रीं । लटकी च घे थोरी ।
नोळखयातें देखौनु गुरुगुरी । श्वानु जैसा ॥ ३९ ॥
त्या उपमा देईन अवघडी । पारि मूर्ख न संडिति खोडी ।
कैसेनि करावी घडि । मुसळाची ॥ १४० ॥

---

१ ' बोलतो अहंता ' हें पाठांतर. २ ' अर्थ एक श्लोकु ' पाठांतर.

आणुंनु जाईली कुतरिं । बैसावेया रचिली चाव्हुरी ।
परी त्या आवडी थोरी । थाळोऱ्याची ॥ ४१ ॥
गर्धभाचां आंगीं चंदन । कस्तुरी सहित कीजे लेपन ।
परि तें नेणे त्याचें महिमान । लोळे उकरडां ॥ ४२ ॥
षडरस पक्वान्नें गोमटीं । सूनु येकी काठवटी ।
सूकरासी नावडे त्यासि प्रीति । विष्टे वरि ॥ ४३ ॥
हे सिकवण जयासि नावडे । ते पाखांडिये जाणावे फुडे ।
नां ते पूयपंकीचे किडे । निर्धारेसि ॥ ४४ ॥
तवं निवृत्तिनाथु म्हणति राहे । तुं बोलतासि तें होये ।
परि हें युग तैसें नोहे । जें गुण मानीति ॥ ४५ ॥
पाहिलें पूर्वजन्मसंस्कारू । उभयपक्षीं शुद्ध जो नरु ।
त्यासि येथें अधीकारु । भाग्योदये ॥ ४६ ॥
सलोकता स्वरूपता । समीपता चौथी सायुज्यता ।
या चारि मुक्ति देता । तो शंकरु असे ॥ ४७ ॥
जे अनक्षर अव्यक्त निःशब्द । जें पूर्ण सत्य शुद्ध बुद्ध ।
तें तुवा केलें विशद । मऱ्हाटिया ॥ ४८ ॥
वंशपारंपरा गुरु । रुषीश्वरा माजि थोरु ।
होता आत्मज्ञान अधिकारु । वसिष्ठासि ॥ ४९ ॥
हें बोलिले वसिष्ठ । ह्मणौनु नांव वासिष्ठ ।
यामाजि श्रेष्ठ । आत्मज्ञान ॥ ५० ॥
तवं ज्ञानदेव ह्मणे कृपासागरा ।
अहो जि परवस्तुचेया अवतारा ।
निवृत्ति नामाचेया पारा । कवण जाणे ॥ ५१ ॥
तुह्मासि आत्मज्ञानदृष्टि । परात्मस्वरूपीं भेटि ।
तयांचे अंतरिं हे सृष्टि । तुह्मी हो ॥ ५२ ॥

१ 'निजविली' पाठांतर. २ दुध तापविण्यासाठीं भोय खणून केलेलें कुंड.
३ काष्ठवढिका=काठवटि. लाकडांचें परळ.

श्रीगुरु आणि संताचेनि मोहें। कांहिं बोलिलों अध्यात्मसोये।
वाक्य श्रीगुरु आर्पित होये। आज्ञा तुमचि ॥ ५३ ॥
संत ह्मणति ज्ञानेश्वरा। अळंकारलें या शास्त्रा।
तें परमेश्वरा। अर्पावें कीं ॥ ५४ ॥
मग उभा ठाकौनि पासिं। वोवि प्रबंध प्रासिं।
विनवित अव्यक्तांसि। ज्ञानदेॐ ॥५५ ॥
ब्रह्म बोलिजे चिद्रप। ब्रह्म ह्मणिजे नादरूप।
तेया ब्रह्मां माझें वाक्पुष्प। आर्पित हो ॥ ५६ ॥
ब्रह्म बोलिजे ज्योतिस्वरुप। शब्दब्रह्म ह्मणति एक।
त्या ब्रह्मासि माझें वाक्य। प्रीति पावो ॥ ५७ ॥
जे ध्यान धारणा आसनीं। नित्य ध्याइजे योगिजनीं।
स्वाधीन जो निरंजनी। तो प्रीति पावो ॥५८॥
अर्पिले वाक्पुष्प। मन जालें परमानंदरूप।
मग मागतसे उमप। पसायदान ॥ ५९ ॥
जें सर्वाजीवां निर्वैर। दुष्टदुर्जन होंतु योगपर।
आनंदभरितु चराचर। न सावे दुःख ॥६०॥
पाखांडिये अवित्पन्न। त्यां घडो परमेश्वरीं भजन।
ते पावो आत्मज्ञान। हे चि पसाय ॥ ६१ ॥
नारी पुरुष प्रीति होतु। गाई बहु क्षीराते स्रवतु।
बहुधान्य पिकतु। धरित्रि ॥ ६२ ॥
वृक्ष शोभोत फळींफुलीं। राजा प्रजा पाळी।
पर्जन्य वर्षो महीतळीं। कामरूप ॥ ६३ ॥
सकळ सुखे वर्तो जन। सकळीं परमेश्वरीं मन।
हें चि पसायदान। म्हणे ज्ञानदेॐ ॥ ६४ ॥

ॐ तत्सदिति श्री योगवासिष्ठे। वसिष्ठरामसंवादे। परब्रह्मयोगसाधनकथनं नाम दशमोध्यायः

संपूर्ण.